जाच्या रजपूत राजकन्येनें माकडतोंड्या शिखानष्टाची बायको होणें योग्य होईल काय?' आणि शेवटीं असें लिहिलें होतें कीं, 'ह्याप्रमाणें मजवर आलेलें संकट दूर न झाल्यास तो अपमान व तें अपावित्र्य मला बिलकुल सहन न होऊन, मी आपला प्राणत्याग करीन.' या तिच्या लेखानें व खुद्द दूतत्व घेऊन जाणाऱ्या कुलोपाध्यायानें राण्याला तिच्याविषयीं ज्या ज्या अगत्याच्या व अभिमानोत्पादक गोष्टी सांगितल्या तेणेंकरून त्याला अतिशय आवेश येऊन, त्यानें, आपला धर्म आणि आपला देश यांचे संरक्षणाकरितां आपल्या जीविताचें जें काय होणें असेल तें होवो, असा निश्चय केला; आणि त्या अभिमानाला पेटून त्यानें म्यानांतून जी तरवार काढली ती, आपला उद्देश पूर्ण केल्याशिवाय पुनः ह्मणून म्यानांत घातली नाहीं. त्याच्या या साभिमानितेचें व निश्चयाचें फल त्याला मिळालें; व त्याच्या भावी उदयाला आणि पूर्वस्वातंत्र्यप्राप्तीसंबंधी कीर्तिमत्वाला हा शुभ शकुनच झाला. ह्मणजे, राणा राजसिंग याच्या या कृत्यानें, त्याची पराधीनता जाऊन तो आपल्या पूर्वजांप्रमाणें, दिल्लीच्या बादशाहाचे मांडलिक राजांच्या यादींतून निघून स्वतंत्र झाला. त्यानें रूपनगरच्या राजकन्येचा संदेश ऐकिल्याबरोबर आपलें सैन्य सिद्ध करण्याचा हुकूम दिला; आणि मोठ्या आवेशानें तो आपल्या फौजेसह रूपनगरावर जाऊन उतरला. नंतर त्याणें लौकरच औरंगजेबाकडून जे लोक रूपनगरास आले होते त्यांस हुसकून लावून, त्या राजकन्येस घेऊन तो लागलाच उदेपुरास दाखल झाला. राणा राजसिंग याचें हें धारिष्टाचें कृत्य ऐकून, जे ह्मणून रजपूत होते त्या सर्वांस अत्यंत आल्हाद होऊन, ते मोठ्या आनंदानें राण्याचे "तांबड्या निशाणाभोंवतीं जमले; आणि त्यांनीं, एवढ्या पराक्रमानें मिळवून आणिलेल्या राजसिंगाचे त्या नव्या राणीचे संरक्षणार्थ पुढें जे श्रम पडतील ते करण्याचा संकल्पच केला;" असें भाटांनीं आपल्या ग्रंथांत वर्णन केलें आहे.

औरंगजेबानें, मारवाडचा ठाकूर जसवंतसिंग (यशवंतसिंह) व अंभेरचा ठाकूर जेसिंग (ज़यसिंह) हे अनुक्रमें काबूल व दक्षिणप्रांत इकडे असतांना त्यांस तिकडच्यातिकडेच कांहीं युक्तीनें विष घालून मारून टाकविलें, असें भाटांनीं लिहिलें आहे. परंतु अशा शूर ठाकुरांस औरंगजेबाला विषप्रयोग कसा करितां आला, याजबद्दलची खुलासेवार हकीकत भाटांनीं आपले ग्रंथांत किंवा 'कवितां'त लिहिलेली कोठें आढळली नाहीं. व यामुळें त्यांच्या मरणाचे खऱ्या कारणांचा संशय तसाच राहतो. असो. हे दोघे बलिष्ठ व शूर असे रजपुतान्यांतले ठाकूर मेल्यानंतर, औरंगजेबास 'निर्वीरमुर्वीतलम्' असें वाटून, त्यानें वाटेल तशी बादशाही चालविली. कोणी आतां आपल्याला हडपता किंवा दडपता असा बरोबरीचा शत्रु राहिला नाहीं, असें त्यास वाटून त्यानें, फार दिवसांपासून योजून ठेवलेला व हिंदुलोकांना छळणारा

असा 'जेजिया' नांवाचा एक कर किंवा डोईपट्टी बसविली. ही डोईपट्टी फक्त हिंदुलोकांवरच बसविली, व यामध्यें त्याचा पक्षपात उघड उघड दिसत होता. औरंगजेबानें जसवंतसिंग व जयसिंग यांस मारविल्यामुळें त्याला आतां मोकळें रान झालें होतें ह्मणून वाटत होतें खरें; परंतु ती केवळ त्याची भ्रांति होती. कारण, औरंगजेबाच्या या अन्यायाबद्दल आणि मनस्वीपणाबद्दल सूड घेण्यास रजपूत राजे पुढें लौकरच एकत्र जमून, त्यांनीं त्याचें पारिपत्य करून खोड मोडण्याची तयारी केली. औरंगजेबानें वरील दोघां ठाकुरांचा नाश केल्यानंतर, त्यांचे जे अल्पवयी मुलगे राहिले होते त्यांचा कबजा घेऊन, त्यांच्या कुटुंबांस कैद करण्याच्या हेतूनें त्यानें आपले लोक त्या त्या राज्यांवर पाठविले. परंतु वर सांगितल्याप्रमाणें रजपूत राजे एकत्र होऊन, त्यांनीं स्वतः औरंगजेबाचे सैन्यावर जाण्याचे पूर्वीच, रजपूत रयतेनें[1] स्वतंत्रपणें मोंगललष्कराचा पराभव केला; आणि औरंगजेबाचा विश्वासघातकीपणाचा हेतु सफै उलथून पडला. जसवंतसिंग याचा मुलगा व मारवाडच्या गादीचा वारस अजितसिंग ह्मणून एक लहान राजपुत्र होता. त्या मुलाची आई ह्मणजे मेवाडच्या सिसोदिया राजकुलांतली राजकन्याच असून, तिचें धैर्य, प्रसंगावधान आणि अभिमान आपल्या वाडवडिलांप्रमाणेंच मोठा कडक होता. आपला पुत्र अज्ञान आहे तोंपर्यंत त्याच्या पालनाचा आणि राज्यव्यवस्था पाहण्याचा सर्व अधिकार आपलेकडे घेऊन, आपला प्रियपति ठाकूर जसवंतसिंग वारला, ह्मणून कांहीं कमीपणा दिसूं न देण्याचा तिचा विचार होता. परंतु केवळ बायकांच्या हातानें राज्यव्यवस्था न राहून, मोंगल बादशाहासारखे शत्रु टकरा व धडका मारीत असतां, त्या झुंजण्यांत या राणीसारख्या बायकोमनुष्याचा टिकाव लागणार नाहीं असें मनांत आणून, राणा राजसिंग यानें, तिला केळवा प्रांत राहण्याकरितां दिला, तेथें तिनें आपल्या लहान्या राठोडपुत्रासह रहावें; व मारवाडचा सर्व कारभार मेवाडच्या राज्यकारभाराबरोबरच आपण पहावा, असें त्यानें ठरविलें. ती गोष्ट त्या विचारी राणीनें प्रसंगाकडे लक्ष देऊन निर्मत्सरपणानें मान्य केली व याबद्दल तिचे गुण वर्णन करण्यासारखे आहेत, यांत संशय नाहीं. राणा राजसिंग यानें आपल्या वंशांतल्या या बहिणीच्या व तिच्या अज्ञान पुत्राच्या रक्षणाकरितां प्रसिद्ध शूर दुर्गादास नांवाचा सरदार तैनातीस दिला. अजितसिंग हा केळव्यास जातांना राण्याचे भेटीस गेला होता; तेव्हां, राण्यानें, राजपुत्राला योग्य असा त्याचा फार उत्तम प्रकारें सत्कार करून, त्याला अनेक प्रकारचीं बक्षिसें दिलीं; व त्या बक्षिसांत एक दहाहजार दि-

---

१. असें ह्मणतात कीं, फक्त २५० रजपुतांनीं औरंगजेब बादशाहाचे पांचहजार लोक मागें हटवून, वरील उभय ठाकुरांचीं कुटुंबें त्यांच्या आटोक्यांतून सुटेपर्यंत त्यांचा पाठलाग केला!

नार किमतीचें बहुमोल माणिक दिलें. ह्याप्रमाणें राजपुतान्यांतलीं दोन बडीं बडीं राज्यें–मेवाड व मारवाड–एकत्र झाल्यामुळें त्यांजकडून मोंगलबादशाही खचित पालथी पडली असती. परंतु, रजपूत लोक फार भोळे असून, ते जसे शूर व कडवे असत तसेच ते विलक्षण दयाभूत असत; यामुळें ते वारंवार त्या बादशाहीचें रक्षण करीत.

औरंगजेब यानें जेजिया कर किंवा डोईपट्टी बसवून, एकंदर हिंदुलोकांस केवळ 'त्राहि भगवन्' केलें होतें. ही अशी चूक त्याजकडून होऊं नये, त्याचे डोळे उघडावे, ह्मणून राणा राजसिंग यानें त्याला आपल्या राष्ट्राचे वतीनें एक सुंदर पत्र लिहिलें. त्या पत्राची भाषा, त्यांतील खुब्या, उपलक्षणांनीं व अन्योक्तीनें लावून लिहिण्याचें कौशल्य, बहुसन्माननीय तथापि कडकपणाची लेखनपद्धति, आणि केवळ लोकोपकारार्थच पत्र लिहिण्याची उत्सुकता, इत्यादि गुण त्या पत्राच्या रचनेवरून उत्तम रीतीनें व्यक्त होत आहेत. अशा या पत्राच्या योग्यतेचें उत्तर अवघ्या मोंगलबादशाहींतून राण्यास न मिळाल्याबद्दल आश्चर्य तें काय ? कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्रांत किंवा कोणत्याही अतिविद्वत्तेच्या काळांत जरी हें पत्र कोणीं वाचिलें तरी त्या वाचकाकडून त्या पत्रास मानच डोलविली जाईल, अशी खात्री आहे. आमच्या उद्देशाप्रमाणें हें पत्र रजपुतांच्या इतिहासांतून तर मुळींच वगळतां कामा नये, आणि ह्मणून आह्मी तें येथें उतरून घेतों. या पत्रांत वर लिहिलेल्या गुणांचा जर कांहीं कमीपणा किंवा अभाव दिसेल तर तो दोष राणा राजसिंगाच्या मूळ पत्रांतला नसून तो आमच्या महाराष्ट्र भाषेचा, किंवा तो मराठींत उतरतांना जसेंच्या तसेंच तें पत्र आह्मास उठवितां आलें नाहीं ह्मणून आमचा, असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं, असें आह्मी येथें सांगून ठेवतों. राण्यानें औरंगजेबास लिहिलेलें पत्र असें आहे:—

"राणा राजसिंग याजकडून औरंगजेब यास—

"सर्व प्रकारच्या स्तुतिस्तवनाला तो सर्वशक्त परमात्मा पात्र आहे. त्याप्रमाणें ती "त्याची स्तुति करून आपल्याला जें या पत्रद्वारें कळवावयाचें तें कळवितों.

"आपलें औदार्य आणि समभाव चंद्रसूर्याप्रमाणें सर्वप्रसिद्ध आहेत. मी आपला "हितेच्छु असून, जरी मीं आपल्या दरबारांत येण्याचें वर्ज केलें आहे तरी, आपली "आज्ञाधारकता आणि राजनिष्ठा यांस मी पराङ्मुख नसून, ती राखण्याविषयीं माझा "पूर्ण उत्साह व तदनुसार वर्त्तन ठेवण्याविषयींची माझी दृढतर इच्छाही आहे. माझी "मनःपूर्वक इच्छा अशी आहे कीं, माझी एकनिष्ठ सेवा, किंवा मदत हिंदुस्थानांतील "सर्व राजे, सरदार, संस्थानिक, नवाब, अमीर, उमराव, वगैरे सर्वांच्या ऊर्जितावस्थेला कारण व उपयोगीं व्हावी; व त्याचप्रमाणें, इराण, तुराण, रूम, शाम, वगैरे

"सातही मुलखांतल्या व निरनिराळ्या ठिकाणच्या रहिवाशांचे व जलस्थलमार्गानें मो-
"ठमोठ्या सफरी व प्रवास करणारांचे मी उपयोगीं पडून, त्या सर्वांचें माझ्या हातानें
"अभेदबुद्धीनें कल्याण व हित व्हावें अशी माझी फार इच्छा आहे. ही गोष्ट सर्वांना
"माहित व सुप्रसिद्ध असून, आपल्यासारख्या समंजस बादशाहांनाही माहित असेल,
"याबद्दल शंका नकोच. माझ्या पूर्वजांनीं आपल्या दरबारची जी सेवा करून आ-
"पल्या पूर्वजांचा स्नेह संपादन केला, आणि आपल्या वाडवडिलांनीं जें त्यांच्याशीं निर-
"भिमानपणें व दोस्तीनें वर्त्तन ठेविलें होतें त्याविषयींचें मी आपल्यास स्मरण देऊन,
"कित्येक महत्वाच्या गोष्टींकडे आपलें लक्ष्य लागावें ह्मणून मी आपल्याला हें पत्र लिहित
"आहें. त्याप्रमाणें लक्ष्य दिल्यास त्यामध्यें आपलें स्वतःचें व अवघ्या रयतेचेंही अ-
"त्यंत कल्याण आहे, हें आपल्या ध्यानांत येऊन चुकेल.

"मला असें कळलें आहे कीं, असा जो मी आपला हितचिंतक त्या माझा पराजय
"करून मला पादाक्रांत करावें ह्मणून आपले फार प्रयत्न चालले असून, त्याकरितां आ-
"पण फार पैसा खर्चीत आहांत; आणि त्या संबंधानें आपल्या खजिन्यांत पैशाची जी
"ओढाताण झाली आहे ती भरून काढण्याकरितां मजपासून कांहीं तरी खंडणी किंवा
"करभार वसूल करण्याची आपली तजवीज सुरू आहे.

"महाराज ! आपले पूर्वज महंमद जलालुद्दीन अकबर, ज्यांचा कीर्तिडिंडिम सर्व पृ-
"थ्वीवर दुमदुमून राहिला होता; व जे हल्लीं अक्षयसुखाचे स्थानीं जाऊन बसले आहेत,
"त्यांनीं आपलें राज्य बावन्न वर्षेपर्यंत कोणत्या समदृष्टीनें आणि निर्वेधपणें केलें; आणि
"प्रत्येक जात व प्रत्येक धर्म यांतील लोक कसे खुष ठेविले—मग ते लोक ब्राह्मण अ-
"सोत, तदितर हिंदु असोत, जैन असोत, ख्रिस्ती असोत, मुसलमान असोत, को-
"णीही असोत,—परंतु त्यांनीं त्या महात्म्याच्या अमदानींत जें कांहीं सुख भोगावयाचें
"तें पूर्णपणें भोगून, अखेरीस त्याला ते दुवा देऊन गेले. त्या महापुरुषाच्या कारकी-
"र्दींत त्याची सर्व जातिधर्मांतल्या लोकांवर एकसारखीच कृपा किंवा गैरमर्जी होत
"असे. त्यांत पक्षपात ह्मणून मुळींच कसा तो नसे व ह्या त्याच्या गुणांवरून सर्व लो-
"कांनीं त्यास 'जगद्गुरु' असें अत्यंत कृतज्ञपणें योग्य नांव दिलें होतें. कीं, अशा नि-
"ष्पक्षपात वर्त्तनाचें अवघ्या जगानें त्याजपासून शिक्षणच घ्यावें.

"त्याचप्रमाणें आपले आजे श्रीमान् महंमद नूरउद्दीन जहानगीर, ज्यांचा हल्लीं स्व-
"र्लोकीं वास आहे, त्यांनींही आपलें राज्य आपल्या वडिलांप्रमाणेंच बावीस वर्षेपर्यंत उ-
"त्तम प्रकारेंकरून केलें. त्यांनीं, आपल्या मित्रांशीं पूर्वीपासून जो सख्यसंबंध चालत
"आला होता तो राखून, आपला कीर्तिप्रसार जास्त करण्याकडे त्यांचें दुर्लक्ष्य नव्हतेंच.

"आणि, ह्याचप्रमाणें खुद्द आपले वडील श्रीमच्छहाजहान यांचेंही राज्य त्यांच्या
"बत्तीस वर्षांच्या कारकीर्दींत सर्व लोकांस अत्यंत मंगलप्रद आणि सुखावह असें
"अनुभवास आलें. यामुळें त्यांची अजरामर कीर्ति होऊन, लोकांमध्यें त्यांची
"दयाभूतता आणि सद्गुण हीं त्यांचे पश्चात् वर्णिलीं जातात.

"अशा प्रकारचे आपल्या पूर्वजांचे कल आणि मनोनिग्रह होते. आणि असे त्यांचे "मनोनिग्रह व अशा त्यांच्या सदिच्छा होत्या ह्मणूनच ते जिकडे जिकडे जात तिकडे "तिकडे जय आणि वैभव हीं त्यांचेपुढें जाऊन त्यांचें स्वागत करीत! ह्याप्रमाणें त्यांनीं "आपलें वर्त्तन ठेवून नंतर हळू हळू एकामागून एक देश आणि किल्ले आपले ताब्यांत "अनायासें आणि सर्वांच्या खुषीनें घेतले. आपल्या कारकीर्दीपासून बघितलें तर, आपण "असें वर्त्तन ठेविलें आहे कीं, आपल्या सर्व रयतेचें व आपल्या दोस्तांचें मन आपल्या "राज्यावरून उठल्यासारखें झालें आहे. प्रत्येकाची आपल्याकडून दिवसेंदिवस जास्त "जास्त नुकसानी होत जाऊन निर्बाधतेनें सर्वत्र केवळ लुटालूट आणि सावडासावड चा-"लली आहे! आपली रयत आपल्या पायांखालीं जणूं काय तुडवली जात असून, आ-"पल्या अमलाखालचा प्रत्येक प्रांत दारिद्र्यानें व्याप्त झाला आहे! लोकस्थिति अगदीं बिघडून "अनेक संकटें, दुःखें आणि यातायाती यांची जशी काय तिजमध्यें मिसळण झाली आहे. "आपल्या अव्यवस्थित खर्चानें जर आपल्याला कंगाली आलेली दिसते आहे तर यावरून "आपल्या पदरच्या सरदारांची कशी काय स्थिति असेल? पराक्रमाचे नांवानें पूज्यच! "व्यापारधंद्याविषयीं विचारूंच नये. व्यापाऱ्यांची नेहमीं आपले संबंधानें कुरकुर ऐकूं "येत असून, ज्या लोकांकरितां आपण इतके अभिमानपुरस्सर वागतां ते मुसलमान "लोकही आपल्या कारकीर्दीस खुष आहेत असें दिसत नाहीं! सारांश, हिंदुलोकांचा रोष, "मुसलमानांची नाखुषी, व्यापाऱ्यांची कुरकुर आणि सरदारांची कंगाली व शौर्यहीनता, "यांनीं, आपलें राज्य व आपला अंमल गच्च भरलेला असावा; व ज्यानें त्यानें सर्वदां "आपल्या कारकीर्दीवर दांत ओंठ खाऊन, रागानें आपलीं डोकीं हापटीत बसावें, हेंच "का आपल्या राज्यकर्तृत्वाचें फल? हिंदुलोकांत कोणाला आपलें सायंकाळचें भोजन "करण्याला देखील असावी तशी स्थिरता आणि उत्साह भासूं नये, यापेक्षां तो आणखी "कोणता जास्त त्रास राजाकडून प्रजेला मिळावा?

"तेव्हां, आपल्या अशा जुलमी व मनस्वी वर्त्तनक्रमानें आपलें राजपद आणि आपली "बादशाही कशी राखली जावी? आपण तर आपल्या नाखुष व दारिद्र्यव्याप्त प्रजेपा-"सून पैसा पिळून काढण्याचा सपाटा चालविला आहे; त्याचा सुपरिणाम कसा अनुभवास "यावा? पूर्वदिशेपासून पश्चिमदिशेपर्यंत सर्वत्र असें प्रसिद्ध झालें आहे कीं, आपण ग-"रीब ब्राह्मण, संन्याशी, बैरागी, गोसांवी व जोगी वगैरेंसारख्या यात्रिक व असंसारी "लोकांपासून, कराच्या रूपानें पैसे उकळतां. ही गोष्ट जर खरी असेल तर, तैमूरलंगाच्या "शूर, पराक्रमी आणि उदार वंशांत येऊन, ह्याप्रमाणें वनवासी व उदासी अशा निरुप-"द्रवी लोकांपासून द्रव्य पिळून काढण्यांत आपण भूषण व सन्मान मानावा, यापेक्षां ह-"लकटपणाची आणि नीचतेची वृत्ति दुसरी कोणतीही नाहीं! ज्या धर्मपुस्तकांना ईश्वर-"दत्त धर्मपुस्तकें असें आपण मानीत असाल, त्या धर्मपुस्तकांत जर आपण बघाल तर "आपल्यास आढळून येईल कीं, ईश्वर हा केवळ मुसलमानांचाच देव आहे असें नसून, तो "सर्व मनुष्यमात्राचा देव आहे. देवाला, मुसलमान आणि त्यांचेशिवाय इतर (पागन) हे

"सारखेच आहेत. मनुष्यांच्या रंगारूपांत फरक ठेवणें हा त्याचा एक सृष्टिनियम आहे.
"त्याच्या सत्तामात्रेंकरूनच मनुष्याला अस्तित्व येतें. तुमच्या शून्यमंदिरांत (मशिदींत)
"तुह्मी त्याची प्रार्थना करितां ती तो ऐकतो; आणि मूर्तीच्या देवळांत घंटानाद होऊन
"अर्चनपूजन केलें तरी तें त्याचेच साठीं होतें व तो त्याजमध्यें असंतुष्ट होत नाहीं.
"दुसऱ्याच्या धर्मरूढीविषयीं अथवा आचारविचाराविषयीं मनांत भलताच ग्रह धरून,
"त्यांची उगाच बदछान करावयाची, हें ईश्वराला संमत असणार नाहीं. आणि येवढ्या-
"करितांच कोणीं ग्रंथकारांनीं असें ह्मटलें आहे कीं, 'या जगामध्यें अनेक रूपांनीं ईश्वरी
"शक्ति आणि भगवच्चमत्कार दृष्टीस पडतात; ह्मणून, त्यांजबद्दलची येवढी आपपरता ठेवूं
"नये. एखाद्या चित्रलेखकानें काढलेलें चित्र आपण घ्यावें आणि तें त्याचे देखतांच पा-
"यांखालीं तुडवावें किंवा फाडून टाकावें अथवा दुसऱ्या कांहीं रीतीनें त्या चित्राची वा-
"ताहत करावी; आणि त्यामुळें त्या चित्रलेखकाला ज्याप्रमाणें वाईट वाटून, त्याचे मनांत
"आपलेविषयीं जी तिरस्कारबुद्धि आणि अहितचिंतन उत्पन्न होईल; तीच गोष्ट, दुस-
"ऱ्याच्या धर्माचारादिकांविषयीं मनांत अनिष्ट वागवून त्यांची पायमल्ली करणें हें, ईश्वरी
"क्षोभाला कारण होणार आहे. ईश्वर हा एक अद्वितीय व अप्रतिम चित्रलेखकच अ-
"सून, त्यानें या विस्तृत विश्वपटावर अनेक धर्माचाररूढी, विविध मनुष्यजाती आणि
"नानास्वभाव व बुद्धि यांचीं चित्रें काढलीं आहेत. तीं चित्रें आपण अभिमानानें
"आणि उद्दामपणानें तुडवून नाहींशीं करण्याचा प्रयत्न करणें ह्मणजे, त्या विश्वपट रं-
"गविणाऱ्या सृष्टिकर्त्याचा अपमान करून त्याचा आपल्यावर राग संपादण्यासारखेंच
"नाहीं का होणार?

"वस्तुतः पाहिलें असतां, आपण हिंदुलोकांवर जो कर बसवून त्यांजपासून पैसे उ-
"कळतां तो केवळ अन्याय आहे. खऱ्या राज्यकर्तृत्वाच्या आणि नीतीच्या बाहेर हें जु-
"लमी कृत्य होत आहे. याच्या योगानें देशाला दारिद्र्य मात्र येण्याचें चिन्ह दिसत आहे.
"हिंदुस्तानांत हे नवीन नवीन तऱ्हांच्या न्यायमनसुब्यांचे नमुनेच आपण घालून देऊन,
"पूर्वीचा या देशांतील बादशाहीचा लौकिक आणि न्यायानुवर्त्तन हीं सफै बुडविण्याचा
"आपला हा क्रम दिसत आहे. आपल्याला आपल्या धर्माचा इतका अभिमान होता आणि
"त्याजविषयीं जर आपली इतकी खात्री होती तर न्यायानें बधितलें असतां आपण
"अशा प्रकारचे कर वगैरे प्रारंभापासूनच एकदम लोकांवर बसवायाचे असते. त्याला
"मध्यें इतका अवकाश कां जाऊं दिला? व ज्या रामसिंगाला सर्व हिंदुलोक मानीत होते
"त्याच्याच कारकीर्दींत हा जुलमी क्रम सुरू कां केला नाहीं? आतां आपले जे कोणी
"हितेच्छु असतील त्यांना बरोबर घेऊन तरी चला. ह्मणजे एकट्या आपल्यावरच आ-
"पल्या ह्या मनस्वीपणाचीं संकटें येऊन, त्यांखालीं आपला एकट्याचाच चुराडा होऊन
"जाणार नाहीं. तथापि, आपल्या थोर मनांत आपण हें समजून असा कीं, शूरांनीं मा-
"शा आणि मुंग्यांना त्रास देण्यांत पौरुष नाहीं. ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे कीं, आ-
"पले दरबारांतल्या आपल्या एकाही मंत्र्यानें आपल्याला योग्य मसलत देऊन, आपल्या

"राज्याचा चांगुलपणा, सन्मान व वजन हीं राहतील अशा प्रकारचा वर्तनक्रम राखण्या-
"विषयीं आपल्यास उपदेश केला नाहीं!"

राणा राजसिंग याजकडून गेलेलें हें पत्र, त्यानें अजितसिंग–मारवाडचा अल्पवयी राजा–यास दिलेला आश्रय, आणि आपण इच्छिलेली रजपुतांनीं काढून नेऊन त्यानें आपली बायको केली, अशा तीन अपराधांनीं औरंगजेबास तो अगदीं अक्षय्य शत्रु झाला. त्याला, राजसिंगाविषयीं अतिशय क्रोध येऊन, जो केवळ आपल्या आश्रयाखालचा जहागीरदार व ज्याची जहागीर (मेवाड) आपल्या अमलाखालीं असल्यामुळें सुखरूप आहे असें औरंगजेब समजत होता, तोच जहागीरदार व आपल्या प्रजाजनांतील एक यःकश्चित् मनुष्य–राणा राजसिंग–आपल्यापेक्षांही डौल मिरवितो आणि सैन्याची वगैरे तयारी ठेवतो, हें चांगलें नव्हे; असें औरंगजेबास वाटूं लागलें. व अशा उन्मत्त झालेल्या रजपूत राण्याची मस्ती जिरविली पाहिजे असा विचार करून, त्यानें आपले तिघेही मुलगे आपल्याकडे बोलावून घेतले. अकबर हा बंगाल्यांत होता; अजीम काबुलांत होता; आणि मुआझिम हा दक्षिणेंत होता. त्या सर्वांना त्यांच्या त्यांच्या फौजांसहवर्त्तमान त्यानें आपल्याबरोबर घेतलें; आणि तो मेवाडावर स्वारी करण्याकरितां निघाला. जातांना त्यानें रीतीप्रमाणें गांवें लुटलीं; तेव्हां तेथील लोक जीवाच्या भीतीनें डोंगरांतून व रानांवनांतून लपून राहिले. नंतर त्यानें कित्येक किल्लेही हस्तगत करून घेऊन, तेथें आपले लोक रक्षणाकरितां ठेविले. चितोड, मंडलगड, मंदोसर, जीरण, वगैरें किल्ले ह्या सपाट्यांतच त्याच्या हस्तगत झाले. हा सर्व प्रकार राण्यानें पाहून, त्यानें आपले एकंदर रजपूत लोक गोळा केले; व त्याचे डोंगरी व विश्वासू असे भील, कोळी, वगैरे लोकही आपापले तीरकमठे घेऊन त्याला साह्य करण्यास सज्ज झाले. हे धनुष्यबाणवाले लोक दरोबस्त अरवली डोंगरांतले होते. रजपुतांस व त्या डोंगरी लोकांस मोंगल लोकांच्या जुलमी वर्तनानें अतिशय संताप येऊन, ते मोठ्या आवेशानें आणि एकचित्तानें एकत्र जमले होते. हे लोक केवळ आपलें राज्य किंवा आपला अभिमान राखण्याकरितां इतक्या आवेशानें जमले होते असें नाहीं; तर प्रत्येक रजपुताला आपल्या जात्यभिमानामुळें आपला देह या कामास अर्पण करणें हेंच आपलें कर्तव्यकर्म आहे, असें वाटत असे. आणि त्यांच्या अभिमानाचेंच अनुकरण डोंगरी भील वगैरेंनींही करून, ते त्यांस साह्यार्थ आले होते. ह्या सर्व समाजाचे मध्यभागीं मेवाडचा रक्तवर्ण ध्वज उभा केला होता.

राण्यानें आपल्या लोकांचे तीन भाग करून, ते तीन वाटांनीं शत्रूंना गांठण्याकरितां योजिले. त्याचा थोरला मुलगा जयसिंग, याजकडे एक भाग देऊन त्यास

अरवली डोंगराचे माथ्यावर पाठवून दिलें. कीं, शत्रु त्या डोंगराचे कोणत्याही बाजूंनीं आले तरी त्यांजवर त्याला हल्ला करण्यास सांपडावें. दुसरा मुलगा भीमसिंग, याला पश्चिमेच्या बाजूला पाठवून, गुजराथेकडील रस्ता रोंखून धरण्यास सांगितलें होतें. आणि तिसरा जो भाग राहिला तो खुद्द राण्यानें आपण घेऊन, तो नाईनघांटाकडे सुरक्षित अशा ठिकाणीं, शत्रु मान्यांत सांपडतील अशा रीतीनें गोट रचून, शत्रूंची वाट पहात बसला. त्यानें आपल्या फौजेच्या डाव्या बाजूकडे त्या घांटांतली एक वाट शत्रूच्या लोकांना जाण्याकरितां ठेविली; कीं, त्या रस्त्यानें ते गेले तर, लगेच त्यांजवर आपल्या लोकांनीं हल्ला करून त्यांस कापून टाकावें. औरंगजेब हा दुबारीपर्यंत आला. परंतु तो तसाच पुढें त्या थडीमध्यें न शिरतां तेथेंच थांबून राहिला; आणि त्यानें तैबरखान नांवाच्या आपल्या सरदाराचे सांगण्यावरून, शाहजादा अकबर यास पन्नासहजार लोक देऊन मेवाडचे राजधानीवर–उदेपुरावर–पाठविलें. यामुळें खुद्द औरंगजेब रजपुतांचे घेऱ्यांत सांपडला नाहीं. रजपुतांनीं औरंगजेबाला घेरण्याविषयीं बऱ्याच युक्त्या लढवून, ज्याअर्थीं ते त्या प्रांतांतील सर्व वाटांचे व दऱ्याखोऱ्यांचे माहितगार होते त्याअर्थीं त्यांनीं, बहुतेक मार्ग आडवून, औरंगजेबाला आपल्या पाशांत आणण्याच्या अनेक तजविजी केल्या[१]; परंतु त्या औरंगजेबाच्या सुदैवानें फसून, तो अलगच राहिला. तो उदेसागराजवळ दुबारीनजीकच तळ देऊन राहिला होता.

शाहजादा अकबर हा आपल्या टोळीचे लोक घेऊन उदेपुरांत शिरला. परंतु त्यांत त्याला हा चमत्कार दिसला कीं, त्यास तेथें कोणीच कांहीं हरकत केली नाहीं. तो तेथील पुष्कळ ठिकाणीं हिंडला व त्यानें तेथील तळीं आणि बेटें बघितलीं; परंतु त्याच्याशीं कोणीच बोललें नाहीं किंवा त्याची कोणीं विचारपूसही केली नाहीं. अकबरानें तेथें आपल्या लष्कराचा तळ दिला. मुसलमान शत्रु धडधडीत आपल्या शहरांत येऊन निर्वेधपणें उतरतात, फिरतात, व हवे तेथें जातात; परंतु त्यांस ह्या कडव्या रजपूत लोकांकडून त्याबद्दल कांहींएक अटकाव होत नाहीं हा मोठा चमत्कार आहे, असें त्या मोंगल राजपुत्रास व त्याचे लोकांस वाटून ते आश्चर्यचकित झाले.

---

१. ह्या लढाईच्या संबंधानें कोणकोणीं कसकसें व कोठकोठें असावें, याविषयींची एकंदर व्यवस्था मुक्तावत सरदार गरीबदास ह्मणून असे त्यानें ठेविली होती; व त्याच्या रणव्यवस्थेच्या संबंधानें भाट लोक त्याची फार स्तुति करितात. त्याचप्रमाणें त्यानें सर्व लोकांची ठिकठिकाणीं भागशः रवानगी करितांना, त्यांस एक मोठें आवेशोत्पादक व्याख्यान देऊन त्यांत सांगितलें कीं, 'अशा अशा रीतीनें शत्रूंना आपल्या मान्यांत आणून घेरून टाका; आणि त्यांना खाण्यापिण्याचा दुष्काळ पाडून शरण आणा.' भाटांनीं त्यावेळचें त्याचें सर्व भाषण उत्तम रीतीनें आपल्या ग्रंथांत वर्णिलें आहे. परंतु त्या शूर मुक्तावताविषयीं येथें ज्यास्त लिहिण्याचें कारण नाहीं.

ह्याप्रमाणें ते उदेपुरांत दंगा व लूटफाट करण्याकरितां आले असून, तेथील कोणीच लोक जेव्हां त्यांस कांहींच बोलेनात असें त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांना ती जागा निर्धोक वाटून, शाहजादा अकबर व त्याचे लोक जणूं काय तेथें विश्रांति घेण्याकरितांच उतरले. नंतर त्या लोकांतील कोणी नमाज पढूं लागले; कोणी जेवण्याखाण्याचे तयारीस लागले; कोणी कांहीं खेळत बसले; आणि कोणी हुक्का ओढीत व गप्पागोष्टी करीत राहिले. ह्याप्रमाणें ते, "चोरी करायला गेले, परंतु तेथेंच ते झोंपीं गेले!" असें भाटांनीं ह्मटलें आहे. आणि तीच गोष्ट खरी ! इतक्यांत ज्या फौजेची तुकडी जयसिंगाचे स्वाधीन होती तिनें ह्या मेवाडच्या मुसलमान पाहुण्यांवर एकदम हल्ला करून, उदेपुरांतून बाहेर जाण्याच्या त्यांच्या सर्व वाटा बंद केल्या. तेव्हां त्या लोकांस बादशाही फौजेला जाऊन मिळण्याचे सर्वच मार्ग खुंटले व ते मोठ्या अडचणींत सांपडले. अकबर यानें गोगुंड्याच्या रस्त्यानें जाण्याचा विचार करून, त्याप्रमाणें त्यानें तिकडे आपले लोकही नेले. तों ते आगींतून निघून फुपाट्यांत पडल्यासारखे झाले; इतकेंच नव्हे, तर त्यांनीं आपल्या हातांनीं आपल्याकरितां अतिशय दुःसह जो संकटमार्ग तो जणूं काय मुद्दाम हुडकून काढिला, असें झालें. ह्मणजे, ते अचूक एका नाळीमध्येंच सांपडले ! तेव्हां, रजपुतांचे डोंगरी प्रदेशांत मोठे विश्वासाचे व शूर साह्यकर्ते जे भील त्यांणीं तो संधि पाहून एक क्षणही न दवडतां ते भराभर दोन्ही बाजवांनीं डोंगरांवर चढून, तेथून त्यांणीं एकसारखा मोठमोठ्या दगडांचा व शिलांचा खालच्या लोकांवर वर्षाव चालविला; व ह्याप्रमाणें त्या अडचणीचे जाग्यांत सांपडलेल्या आपल्या राजाचे मुसलमान शत्रूंच्या पक्षपाती लोकांस त्यांनीं केवळ ठेंचून मारण्याचा एकसारखा क्रम धरिला. तेव्हां त्या बिचाऱ्यांस मुळींच कोठेंही आश्रय नाहींसा होऊन, कित्येक दिवस ते लोक तसेच त्या दरीमध्यें लपून छपून कसा तरी बचाव करून होते. परंतु पुढें त्यांचे खाण्यापिण्यावांचून हाल होऊं लागले; तेव्हां, त्यांनीं शेवटीं राण्याला शरण जाण्याचा निश्चय केला. आणि तसें करण्यावांचून त्यांस गत्यंतरच नव्हतें. त्या डोंगरी लोकांनीं एकसारखा वरून शिलावर्षाव चालवावा; ते डोंगरावर असल्यामुळें खालीं खिंडीमध्यें असलेल्या लोकांस त्यांजवर गोळीबार करतां येईना; आणि जिवंत राहावें तर खाण्यापिण्याचे अतिशय हाल होऊं लागले. तेव्हां, बचाव करण्याला आणि जीव वांचविण्याला राण्याला शरणागत झाल्याशिवाय दुसरी सोयच नव्हती, हें उघड आहे. त्याप्रमाणें अखेरीस अकबर राण्याला शरण जाऊन, त्याणें आपल्याला सुखरूपपणें कृपा करून उदेपुरांतून निघून जाऊं देण्याविषयीं त्याचें अभिवचन मागितलें. त्यावरून राण्यानें त्याजकडून, 'पुढें लढाई चालविणार नाहीं' अशी कबुलात करून घेऊन, नंतर त्याला

आपले डोंगरी वाटाडे देऊन, त्यास जिलवाडच्या नाळींतून पोहोंचवून दिलें[१]. तेव्हां तेही चितोडच्या सरहद्दीचे बाहेर पडेपर्यंत मध्यें कोठेंही मुक्कामास ह्मणून बिलकुल थांबले नाहींत[२]!

---

१. रजपुतांच्या एकंदर इतिहासांत जर बघितलें तर ते जेथें तेथें विलक्षण दयाळूपणानें फसून, त्यांच्या शौर्यवीर्याचा दिसावा तसा त्यांच्या शत्रूला प्रभाव दिसला नाहीं. ह्याबद्दल कर्नेल टॉड् यानें आपल्या ग्रंथांत वारंवार दुःखोद्गार काढले आहेत. शरणागताला मरण देऊं नये हें जें कांहीं त्यांचें ब्रीद आहे तें त्यांनीं शेवटपर्यंत पाळिलें; व त्या त्यांच्या ब्रीदाचा फायदा त्यांच्या शत्रूंनीं मात्र यथेच्छ घेतला. प्रथमतः त्यांच्या नाशाला उद्युक्त होऊन, नंतर त्यांच्यापुढें कांहीं चालेनासें झालें ह्मणजे त्यांना पुनः शरण जावें; कीं, त्या भोळ्या लोकांनीं उदारांतःकरणानें व कनवाळूपणानें आपल्या शत्रूंच्या सर्व अपराधांची क्षमा करून, त्यांस उलट योग्य रक्षण देऊन त्यांचा बचाव करावा; अशा साधेभोळेपणानेंच त्यांणीं आपलें राज्य व वैभव दरोबस्त शत्रूंना घेऊं दिलें. ह्या त्यांच्या दूरदृष्टिराहित्याबद्दल हा इतिहास लिहिणारा टॉड् शूर रजपुतांस फार दोष देतो. तो ह्मणतो कीं, त्यांची भूतदया आणि न्यायदृष्टि ह्या केवळ अंध होत्या!

२. ऑर्म् ह्मणून जो तत्कालीन इतिहासलेखक होऊन गेला असें मागें सांगण्यांत आलें आहे, त्यानें औरंगजेबाच्या संबंधानें बऱ्याच गोष्टी अगदीं अक्षरशः आणि सविस्तरपणें, जशा पाहिल्या किंवा ऐकिल्या तशाच, आपल्या ग्रंथांत लिहून ठेविल्या आहेत. त्या हकीकती वाचल्या ह्मणजे त्यांवरून तर रजपुतांचा थोरपणा आणि मुसलमानांची नीचवृत्ति व विश्वासघातुकता हीं अधिक व्यक्त होतात. वर ज्याप्रमाणें अकबर ऐन प्रसंगीं मोठ्या मिन्नतवारीनें, राण्याला शरण गेल्यामुळें जिवंत सुटल्याची हकीकत सांगितली आहे, तशीच गोष्ट खुद्द औरंगजेबाचे संबंधानेंही घडल्याचें वरील इतिहासलेखकानें आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे. परंतु ही गोष्ट भाटांच्या लेखांत कोठेंही आली नाहीं. ह्मणून आह्मीं ती वर मूळ लेखांत घेतली नाहीं. औरंगजेबाचाही त्या महोदारश्री रजपुतांकडून कोणत्या प्रसंगीं व कसा बचाव झाला, आणि त्या उपकृतीला तो अगदीं अपात्र होता हें कसें सिद्ध झालें, याबद्दल ऑर्म् हा काय लिहितो तेंच बघा, ह्मणजे कळून येईल:—"मध्यंतरीं औरंगजेबानेंही राण्याचे फौजेच्या दुसऱ्या तुकडीबरोबर लढाई चालविली होती. पुढें वि० स० १७३४ ह्मणजे इ० स० १६७८ या वर्षी औरंगजेबाची फौज मारवाडावर आली. तेव्हां तेथील राजानें आपले सर्व लोक आणि लष्कर डोंगरांतील दऱ्याखोऱ्यांत लावून दिलें. औरंगजेबाचें सैन्य त्या लोकांचा पाठलाग करण्याकरितां जें त्यांच्या मागें लागलें, तें येतां येतां डोंगराच्या मधल्या नाळींत सांपडलें. त्याबरोबर त्याजवर दोन्ही बाजूंनीं धोंडे आणि दगड यांचा भराभर एकसारखा पाऊस पडूं लागला. तेव्हां हें काय ह्मणून पाहतात तों त्यांना, आपण चोहोंकडून शत्रूच्या लोकांकडून वेष्टिले गेलों असें आढळून येऊन, ते मोठ्या संकटांतच पडले. ह्याप्रमाणें पुढें निघून जाण्यासही त्यांना अवसर मिळेना. बरें, आतां मागें फिरतील ह्मणावें तों, औरंगजेबाचे लोक नाळींत शिरले असें पाहिल्याबरोबर रजपुतांनीं एका रात्रींतून आपले डोंगरी साह्यकर्ते भील लोक यांच्या मदतीनें मोठमोठे वनवृक्ष तोडून नाळीच्या त्या प्रवेशमार्गांत इतके आणून टाकले कीं, जणूं काय त्या वृक्षांची त्या नाळीचे तोंडीं एक मोठी लांकडी भिंतच झाली; व त्यामुळें मोंगल लोक आणि

औरंगजेबाच्या फौजेची दुसरी तुकडी प्रसिद्ध व शूर दिल्हेरखान या सरदाराचे हाताखालीं होती. तो दिल्हेरखान तिच्यासहवर्तमान मारवाडच्या जवळील दैसूरी

---

त्यांचें सैन्य चकचकीत आंत कोंडलें गेलें. तेव्हां अर्थात् त्या संकटांतून पार पडण्यास मुळींच मार्ग नाहींसा झाला. खुद्द औरंगजेबही त्या नाळींत सांपडला. त्याचे कांहीं लोक नाळीचे बाहेर राहिले होते. परंतु त्यांच्याच्यानें ती वृक्षांची भिंत एका बाजूला करून, आंत कोंडलेल्या लोकांस परत बाहेर काढून घेतां येईना. कारण, रजपुतांनीं पुढें त्या भिंतीचे रक्षणाकरितांच तेथें उभें राहून शत्रूशीं लढाई चालविली ! तिकडे नाळींत सांपडलेल्यांवर डोंगराच्या दोन्ही कड्यांवरून धडाधड दगड पडत होतेच. ह्याप्रमाणें आंतले आंत आणि बाहेरचे बाहेर लोक सांपडून, तेथेंच त्यांचा चुराडा उडून जाण्याचा प्रसंग आला ! ह्या वेळीं औरंगजेबाचे ह्या स्वारीबरोबरच त्याची उदेपुरी नांवाची अत्यंत प्रिय आणि रूपवती बायको आपल्या लवाजम्यानिशीं होती, ती व तिच्या संरक्षणास असलेले लोक मागच्या बाजूस दुसऱ्याच एका डोंगराचे बारींत सांपडले. तेव्हां तिच्या रक्षकांनीं असा विचार केला कीं, येथें आपण जास्त धिंगामस्ती करून उपयोग नाहीं. या धिंगामस्तींत बिबीसाहेबांचा मात्र शत्रूंकडून व्यर्थ छल होऊन, त्यांचा गोषा व अब्रू हीं कायम राहणार नाहींत. तर आपण बादशाहाच्या जनानखान्यासह शत्रूच्या स्वाधीन व्हावें; ह्मणजे, तेच बादशाहाजादीचें नीट रीतीनें रक्षण करतील. असा योग्य विचार करून, ते सर्व राण्याचे स्वाधीन झाले. तेव्हां, त्या रजपूत राण्यानें आपल्या वंशाच्या ब्रीदाप्रमाणें, शत्रूच्या बायका आपल्या हातीं सांपडल्या ह्मणून त्यांचा अपमान किंवा छल न करितां, त्या शाहाजादीचें त्यानें उत्तम प्रकारेंकरून स्वागत केलें; व तिच्या मानमरातबांत कोणत्याही प्रकारें उणें पडूं दिलें नाहीं. इकडे औरंगजेब व त्याचे लोक त्या नाळीमध्यें तसेच आणखी कांहीं दिवस अडकून पडते तर खाण्यापिण्यावांचून ते आपाप मरून जाते, हें उघड आहे. व त्याप्रमाणें त्यांनीं दोन दिवस तेथें चकचकीत उपवास काढलेही ! परंतु राण्यानें असा विचार केला कीं, त्यांना असे अडचणींत धरून खाण्यापिण्यावांचून मारून टाकणें, हें बरोबर नव्हे. ह्मणून, त्यानें रजपूत लोकांस नाळीच्या तोंडावरचा आपला पाहरा उठवून शत्रूंना वाट देण्याविषयीं हुकूम पाठविला. तेव्हां ताबडतोब रजपुतांनीं औरंगजेबाला नाळींतून निघून जाण्यास वाट दिली; व ह्याप्रमाणें तो त्या संकटांतून आपल्या अवशिष्ट लोकांसह पार पडला. औरंगजेब आपल्या संकटांतून व अडचणींतून पार पडल्याचें राणा राजसिंग यास समजल्याबरोबर त्यानें त्याचा जनानखाना, बरोबर आपले लोक बंदोबस्ताला देऊन, योग्य व्यवस्थेनें, त्याजकडे पाठविला. तेव्हां आपल्या लोकांबरोबर त्यानें बादशाह औरंगजेब यास कळविण्याकरितां इतकाच निरोप पाठविला कीं, 'तुह्मी जातांना अरण्यांत जे जे पशुपक्षी आमच्या हिंदुधर्माप्रमाणें मारूं नये ह्मणून आह्माला निषेध आहे त्यांना मात्र तुह्मी कांहीं इजा न करितां आपल्या वाटेनें निरुपद्रवीपणानें जा.' परंतु औरंगजेब कसला अधम ! कीं, त्यानें आपल्यावर उपकार करणाराचे यत्किंचित्ही आभार न मानतां, आपल्या दुष्टबुद्धीप्रमाणें, राण्याला जें कांहीं अप्रिय, तशा प्रकारच्या सर्व गोष्टी करण्यास त्यानें कांहींएक कमी केलें नाहीं. असा तो नीच बुद्धीचा ! आणि, पुढें तर त्यानें राण्याबरोबर मक्कियान् युद्ध चालविलें ! पुढें, पुनः तो पूर्ववत् डोंगरांच्या दऱ्याखोऱ्यांत सांपडून त्याचा सामर्थ्येंच अंत होण्याचा प्रसंग आला होता;

नुंवाच्या एका डोंगरी बारींतून बिनहरकत पुढें चालला. त्याचे मनांत पुढें शाहजादा अकबर ह्याला साह्य करावयाचें होतें. परंतु तो आपल्या तुकडीसहवर्तमान त्या बारींत बराच पुढें आल्यावर, रूपनगरचा राजा विक्रम सोळंखी व गोदवाडपैकीं घनोराचा संस्थानिक गोपीनाथ राठोड हे जे दोघे मेवाडच्या राण्याचे साह्यकर्ते शूर सरदार, त्यांनीं, त्यास अशा पेंचांत धरिलें कीं, बहुतकरून त्याचा अगदीं मोडच करून टाकिला. ह्या प्रत्येक वेळीं रजपुतांना बादशाहाकडील बरीच लूट सांपडली व ह्याप्रमाणें रजपुतांनीं बादशाही फौजेची एकसारखी धूळधाण चालविली. वरील उभय सरदार औरंगजेबाच्या तुकड्यांचे समाचार घेत असतां, इतक्यांत दुसऱ्या बाजूस दुबारीमध्यें खुद्द राणा यानें, औरंगजेब व त्याचा मुलगा अजीम हे दोघे जे नेटानें लढत होते त्यांचीही अकबर व दिल्हेरखान यांच्याप्रमाणेंच वाताहत करून त्यांचा पूर्णपणें मोड केला. एकंदरीनें ह्यावेळीं तिन्ही बाजूंनीं रजपुतांचाच जय होऊन, मोंगल लोकांचा पूर्णपणें पराभव झाला. रजपुतांची तरवार बेलाशक व अव्याहत एकसारखी चालली होती. राण्याकडे दुर्गादास ह्मणून जो मोठा रणशूर सरदार होता व जो मारवाडचा अज्ञान अजितसिंग राठोड याचा व त्याचे मातोश्रीचा संरक्षक ह्मणून राणा राजसिंग यानें नेमिला होता, त्यानें तर ह्या वेळीं आपलें शौर्य असें गाजविलें कीं, बादशाही फौजेंत मोठे कसबी असे पोर्च्युगीज (फरांसीस) गोलंदाज होते; पण त्यांना देखील कापून टाकून, त्यांच्या तोफा निरुपयोगी करून टाकिल्या. ह्या एकंदर लढाईंत औरंगजेब याजकडील लोक आणि त्याचें सामानसुमान यांचा फार नाश झाला. सामानसुमान तर दरोबस्त रजपुतांना मिळालें.

---

परंतु, इतक्यांत ह्याचे साह्याला ह्याचे दोघे मुलगे, अजीम व अकबर हे, येऊन पोहोंचल्यामुळें ह्याचा बचाव होऊन, तो ह्या डोंगरी प्रदेशांतून बाहेर निघाला. ह्या वेळीं औरंगजेबाचें वयही बरेंच वृद्ध होऊन, ह्याच्यानें ही अशी रानांवनांतून आणि डोंगरांखोऱ्यांतून स्वाऱ्या करीत फिरण्याची मेहनत होण्यासारखा ह्याचा काळ राहिला नव्हता. ह्मणून, ह्यानें पुढें शत्रूंशीं झुंजण्याचें काम आपल्या उभय पुत्रांवरच सोंपवून, आपल्या फौजेचे दोन भाग करून ते दोघांचे स्वाधीन केले; आणि ह्या उभयतांवर आपली देखरेख ठेवून, तो स्वस्थपणें, आपलें अवशिष्ट आयुष्य शांततेंत आणि गृहच्छायेंत घालविण्याकरितां, अजमीर शहर ही आपली राहण्याची व सदरेची जागा करून, तेथें आपल्या दरबारी मंडळासह सकुटुंब सुखानें राहिला. तेथें त्यानें आपले स्वतःच्या रक्षणाकरितां चारहजार घोडेस्वार मात्र आपल्याजवळ ठेविले; व बाकीचें सैन्य वर सांगितल्याप्रमाणें दोघां मुलांकडे विभागून दिलें. नंतर त्या मुलांनींही आपआपल्या मुलखांतून जें सैन्य आपल्याबरोबर आणिलें होतें तें त्या बादशाही फौजेंत मिळवून, त्या दोघांनीं आपल्या बापाचा किना गिरविण्याचें ह्मणजे लढाईचें काम तसेंच त्या प्रदेशांत निरनिराळ्या ठिकाणीं चालविलें. परंतु त्या वर्षाच्या अखेरीपर्यंत त्यांची त्या डोंगरी रस्त्यामुळें मेवाडांत कांहींच गति चालली नाहीं!"

आणि औरंगजेब व त्याचे जिवंत राहिलेले लोक हे आपले जीव बचावून मात्र नि-घाले. यापूर्वी कधींही त्यांना अशी लज्जा पदरीं बांधून तोंड लपवून पळावें लागलें नव्हतें. या दोन्ही तिन्ही ठिकाणच्या लढायांतून राण्याकडचेही चांगले चांगले व नांव घेण्यासारखे शूर सरदार बरेच पडले; व त्यांचीही बरीच नुकसानी झाली. तथापि, जयाचा वांटा आणि यथेच्छ लूट हीं तिचेबद्दल त्यास चांगलीं मिळालीं. मोंग-लांकडील दौलतीची व सामानसुमानाची लूट मिळविण्याचें मुख्य यश राण्याचे सरदार मोखिम आणि सुक्तावत यांजकडे आहे, असें भाटांनीं लिहिलें.आहे. हा बडा जय रा-ण्याला वि० सं० १७३७ च्या फाल्गुनांत, ह्मणजे इ० स० १६८१ च्या मार्च-मध्यें मिळाला.

औरंगजेबाच्या पराजय पावून कसाबसा जीव घेऊन पळालेल्या फौजा पुढें चि-तोडगडाच्या खालीं एकत्र जमल्या. औरंगजेब याचा नाइलाज होऊन, त्याचें शूर रजपुतांपुढें कांहीं चालेनासें झालें. तेव्हां त्याणें आपला मुलगा मुआझिम यास दक्षिणेंतून बोलावून आणण्याकरितां निरोप पाठविला. कीं, तिकडे शिवा-जीचा बंडावा आहे खरा; परंतु तिकडच्यापेक्षां इकडे तुझ्या शौर्याची आणि मदतीची फार जरूर आहे. इतक्यांत औरंगजेबानें आपल्या अवशिष्ट लोकांना सामानसुमानाचा पुरवठा होण्याकरितां अजमीरास हुकूम पाठविला होता. परंतु मध्येंच, प्रसिद्ध जयमल्लाचा वंशज शूर पुरुष सावळदास यानें त्या पुरवठ्याची आणि मोंगलांची गांठच पडूं दिली नाहीं. तेव्हां तर मोंगलांच्या लोकांचे खाण्यापिण्यावांचून फार हाल झाले! अशीं एकामागून एकेक जास्त संकटें वाढत चाललीं, हें पाहून औरंगजेब निराश झाला; आणि ही दगदग व यातायात करण्याचा त्याला अगदीं कंटाळा येऊन व तो अगदीं त्रासून, 'आतां पुढें लढाई वगैरे काय करावयाची असेल ती तुह्मीच चालवा,' असें आपले मुलगे अजीम व अकबर यांस सांगून व त्यांजवरच सर्व प्रकारचा भार टाकून, आपण नि-घून अजमीरास गेला. नंतर अजमीराहून त्यानें रोहिल्लाखान याजबरोबर पुष्कळ पुरवठा आणि बाराहजार लष्कर देऊन, त्यास सावळदासाबरोबर लढण्याकरितां आ-पल्या मुलांकडे मदतीला ह्मणून पाठविलें. इतक्यांत मारवाडच्या राठोडाकडील स्वार येऊन सावळदासाला मिळाले; आणि त्यांची व रोहिल्लाखानाची पुर मांडेल या ठिकाणीं गांठ पडून, रोहिल्लाखानाचा अगदीं पराभव झाला; व त्याचा पुष्कळ नाश होऊन, अखेरीस त्याची व शाहजाद्यांची नुस्ती भेटही न होतां, तो अजमी-रास परत गेला.

ह्याप्रमाणें राणा आपल्या फौजांच्या तुकड्या घेऊन ठिकठिकाणीं जय मिळवीत

होता. त्याच वेळीं तिकडे युवराज भीमसिंग हाही स्वस्थ न बसतां, तो आपली फौज घेऊन गुजराथेवर तसाच स्वारी करण्यास गेला होता; व तिकडे त्यानें ईडर प्रांत काबीज करून तेथील मुसलमान अधिकारी हसन यास हुसकून दिलें. मग तेथून तो निघून, वीरनगरा(वडनगरा)वरून पट्टणास दाखल झाला; व तेथें त्यानें पुष्कळ लूट मिळविली. नंतर तो तसाच सिद्धपूर, मोरासो वगैरे शहरें काबीज करीत व लूट मिळवीत पुढें सुरतेकडे चालला होता. परंतु, त्याच्या स्वारीनें त्या प्रांतांतील लोकांची फार पळापळी होऊन, कित्येक तर राण्याकडे दाद मागण्यास गेले. तेव्हां, हें चांगलें नाहीं असें राण्यास वाटून, त्याणें भीमसिंगाला परत बोलाविलें. ह्याप्रमाणें भीमसिंग हा बापाप्रमाणेंच विजय संपादून परत आला.

रजपूत लोक मोठे प्रामाणिक, विश्वासू, दयाशील आणि एकवचनी असते; परंतु त्यांचे विरुद्ध औरंगजेबाचें वर्तन असल्यामुळें व त्यानें रजपुतांस अतिशयच संतापविलें असल्यामुळें ते चांगलेच हात धुऊन त्याच्या पाठीशीं लागले होते. राणा राजसिंग याचे मंत्रीमंडळांत एक दयाळसाह ह्मणून मोठा धीरवीर आणि तरतरित सरदार होता. तो राण्याची दुसरी एक फौज घेऊन, माळव्यांत नर्मदा आणि बिटवा यांचेपर्यंत मुलूख काबीज करीत गेला. त्याणें सारंगपूर, देवास, सरोंज, मांडू, उज्जनी आणि चंदेरी हीं शहरें लुटलीं व तेथील रक्षक कापून टाकले. हीं सर्व शहरें त्या वेळीं केवळ मुसलमानांनीं दाट वसलेलीं होतीं. परंतु तीं दयाळसाहानें अगदीं उद्वस्त करून टाकिलीं! मुसलमानांनीं जितका हिंदूंचा छळ केला होता तितक्याचें उट्टें काढण्यास, हात फावल्यावर बिलकुल कमी करावयाचें नाहीं, असा रजपुतांनीं निश्चयच केला होता; व त्याप्रमाणें दयाळसाह यानें आपली तरवार मोंगलांचे पक्षपात्यांवर एकसारखी चालविली. त्याविषयींचें वर्णन भाटांनीं जें केलें आहे त्यांत त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, "दयाळसाह याच्या विलक्षण शौर्याला एकंदर म्लेंच्छ लोक इतके भीत असत कीं, ते आपल्या बायका व मुलें बेलाशक टाकून देऊन, जीव वांचविण्याकरितां पळून जात किंवा लपत फिरत; आणि नंतर त्या शूर रजपुतांनीं बेलाशक त्यांची सर्व जिंदगी व मालमत्ता आपली ह्मणून बरोबर भरून घ्यावी व जी नेण्यासारखी नसेल तिला आग लावून तिची राखरांगोळी करावी." इतकेंच नव्हे; तर, त्यांच्या मुसलमान शत्रूंनीं त्यांचा जसा छळ केला तसाच त्या रजपुतांनींही त्यांचा सूड उगविण्यास कमी केलें नाहीं. "गांवांतले काजी धरून व पकडून आणावे; त्यांच्या दाढीमिशा मुंडाव्या; आणि त्यांचीं कुराणाचीं पुस्तकें विहिरींत टाकून द्यावीं." असाही क्रम त्यांनीं चालविला. दयाळसाह याचें नांव जरी दयाळपणाच्या गुणाचें दर्शक होतें; तथापि, मुसलमानांच्या संबंधानें त्याजमध्यें यत्किंचित्‌ही दयाळुता वसत

नव्हती, असें ह्मटलें तरी चालेल. व त्याप्रमाणें त्यानें माळवाप्रांत बहुतेक अनविंध्न करून टाकिला; आणि तो जिंकलेला सर्व प्रदेश आपल्या स्वामीचे (राण्याचे) चरणीं अर्पण केला. तो मेवाडचा पूर्ण अभिमानी बनला असून, पुढें सुलतान अजीम याजबरोबर त्यानें चितोडाजवळ लढाई केली. त्या वेळीं त्याला राठोड आणि खिची सरदार जे मोखीम, गंगा सुक्तावत, साळुंब्याचा रतन चोंडावत, साद्रीचा चंद्रसेन झाला, बेदलाचा सबलसिंग चव्हाण आणि बिजोलीचा बेरीसाळ पवार हे.मुख्य साह्यकर्ते होते. यांपैकीं चार ठिकाणच्या संस्थानिकांनीं लढाईचे पूर्वदिवशीं सायंकाळीं, आपल्या लोकांना लढाईच्या संबंधानें विशेष उत्साह येऊन, आपल्या देशाचा व जातिधर्माचा अभिमान वाटावा ह्मणून, मोठालीं व्याख्यानें दिलीं, असें भाटांनीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे. अशा ह्या शूर सरदारांनीं तरुण मोंगल राजपुत्रावर उत्तम प्रकारचा जय मिळविला, आणि त्याला रणांगणांतून पळ काढण्यास लावलें. पुढें सुलतान अजीम हा रणथंबोर येथें जाऊन लपून राहिला. अजीम याचा हा पराजय होण्यापूर्वीं नुक्तेंच एक वर्ष त्यानें आपल्या पराक्रमानें चितोडच्या लोकांस आश्चर्यचकित करून टाकिलें होतें; परंतु त्याचीच आतां या वेळीं अशी दशा झाली कीं, त्याला आपला जीव घेऊन पळतां पुरे वाट झाली !

मोंगलाशीं प्रथमतः राण्याला वाद उपस्थित करण्यास मारवाडच्या अज्ञान राठोडपुत्राचा अभिमान कारण झाला, हें पूर्वीं सांगितलेल्या हकीकतीवरून कळून येण्यासारखें आहेच. आणि तेव्हांपासून राण्यानें मेवाड आणि मारवाड या दोन्ही ठिकाणच्या फौजा वगैरे सर्व एकत्र करून, उभयतांचें एककाळींच हित व कल्याण करून, आपलें शौर्यवीर्य गाजविण्यास सुरवात केली होती. त्यानें ह्याप्रमाणें दोन्ही राज्यांतली फौज एकत्र करून पहिल्यानें, गोदवाड प्रांताची राजधानी गनोरा येथें जी मोंगलाची फौज होती तिजवर स्वारी करून जय मिळविला होता. त्या वेळेपासून त्या अज्ञान राठोडाची शूर माताही राणा राजसिंग यास पूर्णपणें अनुकूळ होऊन, तिनें आपल्या नवऱ्याचें वैभवैश्वर्य कायम ठेवण्याकरितां जे प्रयत्न करणें इष्ट असून, राण्याच्या मसलतीनें वागणें जितकें अवश्य होतें, तितक्या प्रकारें ती वागत असे. शिवाय, ती मेवाडच्या सिसोदिया राजवंशांतलीच कन्या असल्यामुळें तिला राण्याशीं दुजा भाव ठेवण्याचेंही कारण नव्हतेंच. कां कीं, मारवाडचा लौकिक आणि पूर्ववैभवैश्वर्य राखण्याविषयीं जितका तिला अभिमान असे तितकाच मेवाडचा व एकंदर रजपूत जातीचा अभिमान राण्याला असल्यामुळें, त्याच्याशीं मिळून मिसळून आणि त्याच्या मसलतीप्रमाणें वागण्यांत आपलें कल्याण आहे, असें ती समजत असे. ह्याप्रमाणें सिसोदिये व राठोड हे एकत्र होऊन दोघांच्या विचारानें आणि साह्यानें जें काम

होणें तें होत असे. राजपुत्र भीमसिंग यानें पुढें सिसोदिये व राठोड या दोन्ही कुटुंबांच्या वतीची ह्मणून अकबर व तैबरखान यांच्यांशीं लढाई केली व तींत त्यांचा अगदीं मोड करून टाकला. त्यानें त्या दोघां मोंगलांवर जो हा जय मिळविला, त्याजबद्दलची एक विलक्षणच गोष्ट भाटांनीं आपले ग्रंथांत वर्णिली आहे. ती अशीः— एका रजपूत सरदारानें ५०० उंटांवर मशाली बांधून, रात्रीच्या वेळीं ते उंट मोकळेच मोंगलांच्या गोटांत सोडिले. तेव्हां, हा काय चमत्कार आहे, ह्मणून गोटांतले सर्व लोक त्या उंटांकडे बघत उभे राहिले असून, ते काय अनर्थ करतील ह्याची त्यांना काळजी वाटत होती. तसेंच, कित्येक त्यांच्या मागें लागले; ह्यामुळें ते धूम शत्रूंच्या सगळ्या गोटांत धांवत अस्ताव्यस्त फिरूं लागले. तेव्हां गोटांत एकच गोंधळ होऊन गेला. हा संधि पाहून रजपुतांनीं एकदम त्यांचेवर हल्ला केला; आणि त्यांची कापाकाप चालवून, त्यांस पळवून लाविलें. ह्याप्रमाणें एकामागून एक रजपुतांना जय मिळत जाऊन, मोंगल बादशाहाचें वजन अगदीं कमी होत चाललें. तसाच, तो लोकांना अत्यंत अप्रिय होत चालला होता. ह्मणून, राण्यानें असा विचार केला कीं, औरंगजेबाला पदच्युत करून त्याचे गादीवर त्याचा सुस्वभावी मुलगा अकबर यास बसवावें. अकबर याला आपल्या बापाचें वर्तन सर्व माहित असून, त्यानें त्याचा बाप शाहजहान याजपासून कशी गादी मिळविली हेंही त्याला ठाऊक होतेंच. तेव्हां, अशा बापापासून त्याचेंच अनुकरण करून त्याची गादी आपण बळकावणें यांत कांहींच दोष नाहीं असें त्याला वाटून, राण्याच्या मसलतीस त्यानें आपली संमति दिली. परंतु, ज्या दिवशीं अकबराच्या मदतीनें औरंगजेब बादशाहाला कैद करण्याचा बेत होता त्याचे अगोदरच औरंगजेबाला तो सर्व बेत समजला. इकडे, राण्याच्या जोश्यानें शुभ दिवस पाहून त्या दिवशीं औरंगजेबाला कैद करण्यास जाण्याविषयींचा मुहूर्त सांगितला होता व सर्व प्रकारची तयारी झाली होती. पण, वर सांगितल्याप्रमाणें जेव्हां औरंगजेबाला ती बातमी समजली तेव्हां, तो युक्तिवान् नसता तर खचित राण्याकडून कैद झाला असता; परंतु ज्या युक्तींनीं आणि कपटानें त्यानें राज्य कमावलें होतें त्याच युक्तींनीं आणि कपटानें त्यानें आपल्या पुत्राला आणि त्याचे पक्षपाती रजपुतांनाही फसविलें. या वेळीं औरंगजेबाजवळ त्याला आपलें रक्षण करण्याकरितां फौजही नव्हती. फक्त त्याचे संरक्षक असे थोडेसे जुजबी लोक त्याचे जवळ होते. अकबर तर शत्रूला मिळून आपल्याला कैद करण्याच्या उद्देशानें एक दिवसाच्या मुक्कामावर येऊन पोंचला आहे असें त्याला कळलें; व त्याचे दुसरे वडील मुलगे मुआझिम आणि अजीम हे तर त्याजपासून पुष्कळ लांब होते. तेव्हां, ते वेळेवर आपल्या साह्याला

येतील अशी त्याला आशा नव्हती. एकेक क्षण मोठ्या मोलाचा जात होता. ह्मणून कांहीं तरी युक्ति करून, हें आलेलें संकट कसें तरी लौकर दूर केलें पाहिजे, या योजनेस तो लागला. त्यानें चट्कर एक पत्र लिहिलें, व तें पत्र आपल्या गुप्त हेराचेच हातानें रजपूत सरदार, दुर्गादास, जो अकबराला साह्य करण्याकरितां त्याच्या बरोबरच येत होता, त्याचे हातीं जाऊन पडेल अशी व्यवस्था केली. त्या हेरानें तें पत्र दुर्गादासाचे डेऱ्यांत नेऊन टाकिलें. औरंगजेबानें तें पत्र कपटानें मुद्दाम अकबराच्याच नांवानें लिहिलें होतें; व त्यांत त्याला असें कळविलें होतें कीं, 'तुला रजपूत साह्य होऊन तख्तावर बसवीत आहेत हें बरें आहे. येणेंकरून आपलें कार्य सहज पार पडेल.' आणि त्याखालीं औरंगजेबानें आपली सही केली होती. हें पत्र दुर्गादासाला पोंचलें व त्यांतील मजकूर वाचून त्याला अकबराविषयीं शंका उत्पन्न होऊन, त्यानें एकदम त्याचा पक्ष सोडला. दुर्गादासाला असें वाटलें कीं, हे बापलेंक एक असून, कपटानें अकबर हा आपणास बापापासून विभक्त असल्याचें दाखवित आहे; ह्मणून अशा कपटी मनुष्याला साह्य करून आपल्याला दुःखांत घालून घेणें चांगलें नाहीं. आणि, असा विचार करून, त्यानें त्याला साह्य करण्याचें अगदींच नाकारलें. येणेंप्रमाणें औरंगजेबाचा इष्ट हेतु अल्पायासानें सिद्धीस जाऊन, त्याला आपल्या संरक्षणाची योग्य तजवीज करण्यास अवकाश सांपडला. तिकडे औरंगजेबाला ठार मारण्याकरितां तैबरखान याचाही कांहीं प्रयत्न चालला होता. परंतु अकबराचा रजपुतांनीं पक्ष सोडल्याचें समजल्याबरोबर त्याचा पूर्वीचा आवेश शिथिल पडून, तो औरंगजेबाचे हातीं सांपडला व लागलाच मारला गेला. इतक्यांत औरंगजेबाला त्याचे दुसरे मुलगे, मुआझिम आणि अजीम असे येऊन मिळाले व त्याचा सहज बचाव झाला. रजपुतांनीं वर सांगितल्याप्रमाणें अकबराचा जरी पक्ष सोडला होता, तरी त्याला आपल्या आश्रयांतून दूर केलें नव्हतें. पुढें त्यानें दुर्गादासापासून ५०० रजपूत आपल्याबरोबर घेऊन बापाच्या भीतीनें तो

१. ह्या कारस्थानाच्या युक्त्यांनीं पूर्वीं मुसलमान राजांनीं मोठ्या बाणीच्या वेळा मारून नेल्या आहेत. औरंगजेबाचे पूर्वीं शिरशाह यानें मालदेवाला असेंच युक्तीनें फसवून, आपलें कार्य उरकून घेतलें होतें.

२. दुर्गादास हा लूनी नदीचे कांठीं द्रुनेरा नांवाचा एक प्रांत आहे तेथील ठाकूर असून, तो, राणा राजसिंग याचे पूर्ण विश्वासांतला होता. आणि ह्मणूनच त्याला राण्यानें मारवाडचा अज्ञान अजितसिंग राठोड आणि त्याची मातोश्री यांचा संरक्षक नेमिलें होतें. ही हकीकत मागें (पृष्ठ २३५ मध्यें) आलीच आहे. दुर्गादासानें, राण्यानें आपल्यावर विश्वासून जें महत्वाचें काम आपल्याकडे दिलें होतें तें मोठ्या इमानीपणानें आणि चांगल्या रीतीनें बजाविलें; व त्याबद्दल मुसलमान इतिहासलेखक आणि भाट लोक त्याची फार स्तुति करितात. तो प्रामाणिकही तसाच असे.

मेवाड आणि डोंगरपूरच्या आडवाटांनीं जाऊन, नर्मदेच्या पलीकडे मराठ्यांच्या राज्यांत रायगडावर संभाजीराजाच्या आश्रयाला राहिला. व तेथून पुढें थोड्याच दिवसांनीं तो इंग्रजांच्या एका गलबतावरून इराणास गेला.

एक मुसलमान इतिहासलेखक लिहितो कीं, "ह्याप्रमाणें अकबर सुटून गेल्यावर, मग संभाजीराजानें इतका पुंडावा मांडला कीं,* औरंगजेबाला मोठी काळजी पडली. अशी काळजी पूर्वी त्याचा भाऊ सुजा याचे संबंधानें मात्र त्यास पडली होती. संभाजीच्या संबंधाची जी त्याला भीति वाटत होती तिच्या योगानें त्याला रजपुतांशीं युद्ध चालविण्यास एकप्रकारें मोठाच व्यत्यय आल्यासारखें झालें. एकानें दोन बाजूंच्या वेगवेगळ्या दोन शत्रूंशीं झुंजणें ह्मणजे मोठी पंचाईतच खरी! रजपूत मोठे शूर आणि तरवारबहादूर होते. तसेच मराठे हे धूर्त, चपल आणि फसव्ये होते. तेव्हां एकएकट्या शत्रूची पाठ पुरविल्याशिवाय गत्यंतर नव्हतें; व त्याकरितां कोणाशीं तरी तह करून दुसऱ्याचा समाचार घेतला पाहिजे होता. औरंगजेबाचे मनांत मराठ्यांच्या पाठीस लागावयाचें होतें. परंतु, रजपुतांशीं आपण होऊन तह करण्याची गोष्ट काढणें ह्मणजे आपल्या बादशाहीस केवळ बट्टा होय, ह्मणून, याविषयींची रजपुतांकडूनच गोष्ट निघाली पाहिजे, असा त्याचा हेतु होता. तो हेतु, बोलतां बोलतां त्याचेकडून त्याचा सरदार दिल्हेरखान यास समजला, व दिल्हेरखानाकडून, त्याच्या हाताखालीं कांहीं दिवस लष्करी अधिकाऱ्याचें काम केलेल्या एका रजपूत सरदारास समजला. तेव्हां, त्याप्रमाणें गोष्ट घडवून आणण्याचें त्या रजपूत सरदारानें कबूल केलें. तो रजपूत सरदार, जसा काय, मोंगलांच्या लष्करांतली नौकरी सोडून, आतां आपल्या देशीं जाऊन स्वस्थ घरीं बसण्याच्या हेतूनें ह्मणून निघाला; व जातां जातां मध्यें राण्याला भेटण्याकरितां चितोडास उतरला. नंतर त्यानें राण्याची भेट घेतली. त्या भेटींत राण्याचें व त्या रजपूत सरदाराचें अनेक विषयांवर बोलणें झालें. बोलतां बोलतां युद्धें, लढाया, वगैरेंविषयीं बोलणें निघून, त्या सरदारानें हळूच युक्तीनें मोंगलांच्या व रजपुतांच्या सल्ल्याविषयींच्या गोष्टी काढल्या. व शेवटीं,

---

अकबरानें त्याचा आश्रय केला तेव्हां, त्याला आपल्या स्वाधीन करावें ह्मणून, औरंगजेबाचा दुसरा मुलगा सुलतान अजीम यानें, कोणत्याही प्रकारचा उद्देश किंवा बोली वगैरे कांहीं एक न कळवितां, दुर्गादासाकडे चाळीसहजार मोहरा नजर ह्मणून पाठविल्या. तेव्हां दुर्गादासानें, त्या नजरेचा अर्थ, आपण अकबराचा पक्ष सोडावा किंवा त्याचा विश्वासघात करून त्यास सुलतान अजीम याचे स्वाधीन करावें याकरितां अप्रत्यक्ष रीतीनें हा लांच आहे असा समजून, इतक्या द्रव्याला लुब्ध होऊन आपला इमानीपणा आणि मनाचा थोरपणा सोडिला नाहीं! ह्मणजे, सुलतान अजीम याणें पाठविलेली नजर किंवा लांच दुर्गादासानें स्वीकारली नाहीं, हें सांगणें नकोच! रजपुतांच्या इतिहासांतून अशा बाणेदारपणाचीं उदाहरणें अनेक आढळतात!

'आपली मर्जी असेल तर, आतां हीं युद्धें बंद करण्याकरितां आपणां उभयतांमध्यें सल्ला व तह होण्याची खटपट मी करितों व त्यांत मला यश मिळेल अशी माझी खात्री आहे,' असें त्यानें राण्यास बोलून दाखविलें. तेव्हां, राण्यानेंही आपला त्या गोष्टीस अनुकूल अभिप्राय कळविला; व 'आमच्या पक्षानें जें काय बोलावयाचें तें तुह्मीच बोला,' असा त्यानें त्यास अधिकार दिला." मुसलमान इतिहासलेखकाच्या या लेखाशीं भाटांच्या लेखाचेंही प्रत्यंतर मिळतें. इतकेंच नव्हे; तर, मुसलमानी इतिहासांत त्या रजपूत सरदाराचें जें नांव दिलेलें नाहीं तें भाटांच्या लेखांत सांपडतें. त्या रजपूत सरदाराचें नांव राजा श्यामसिंग असून, तो बिकानीरचा राहणारा होता. त्यानें राण्याच्या परवानगीनें बादशाहाशीं तहाचा विचार चालविला. परंतु बादशाहानें 'आज' 'उद्यां' अशी चाळवाचाळव लाविली; व पुढें, 'आतां पावसाळा गेला ह्मणजे काय तो नक्की ठराव करूं' असें सांगून, तो तह लांबणीवर टाकिला. तहाचा बेत चालू होता व पुढें पावसाळाही लागला, ह्मणून रजपूत लोक स्वस्थ होते. परंतु, औरंगजेबानें पावसाळ्याची फुरसत मिळाल्याबरोबर, आपलें मोडकळीस आलेलें सैन्य पुनः सुधारून त्यामध्यें भरती वगैरे केली, आणि पावसाळा संपल्याबरोबर मात्क्यान् लढाई सुरू केली. हा त्याचा घातुकपणा रजपुतांना पुरा समजून आला होता. परंतु ते स्वतः घातुक बुद्धीचे आणि विश्वासघातकी नसून, बोलल्याप्रमाणें करण्यास चुकणारे नसल्यामुळें, दुसऱ्याचीं कपटें व कारस्थानें त्यांच्या ध्यानांत फारशीं राहत नसत. आणि, रजपुतांच्या शत्रूंनीं त्यांजवर जो कधीं कांहीं जय मिळविला असेल तो तरी, अशा घातुक बुद्धीशिवाय व विश्वासघात केल्यावांचून, केवळ आमन्यासामन्याला उभें राहून, आपल्या आंगच्या वीर्यपराक्रमानें केला असल्याचें एकही उदाहरण त्यांच्या एकंदर इतिहासांत सांपडणें मुष्किलीचें आहे! औरंगजेब वर लिहिल्याप्रमाणें आपल्या फौजेची तयारी करून समरांत उभा राहिल्याबरोबर, रजपुतांनींही त्याच्याशीं सामना केलाच. पण अखेरीस, "जेजिया (डोईपट्टी) कराचा कांहीं एक निकाल न लागतां, चितोडच्या आसपासचा जो प्रदेश मोंगलांनीं घेतला होता तो, व जोधपूरचें राज्य (मारवाड) हीं रजपुतांचीं रजपुतांस परत देऊन, मोंगलांचा आणि रजपुतांचा तह झाला; व त्या दोघांची लढाई संपली," असें मुसलमान इतिहासकर्ते लिहितात. व याबद्दलचा खरेपणा, खालीं टिपेंत राण्याकडून गेलेल्या यादीचा जो मसुदा दिला

१. वर सांगितलेली यादी पुढें लिहिल्याप्रमाणें औरंगजेबाकडे राण्याकडून गेली होती:—
"आपले आज्ञाधारक सेवक, आपल्या हेतूप्रमाणें आणि आपल्या पाचारणाप्रमाणें राण्याकडून "खालीं लिहिल्याप्रकारची लेखी यादी देऊन पाठवीत आहेत. आमची अशी आशा आहे कीं,

आहे त्यावरूनही दिसतो. राण्याकडून ही यादी व ती कबूल असल्यास, आपली तह करण्याची खुषी असल्याबद्दलचें पत्र अशीं, शूरसिंग (राण्याचा चुलता), सरदार पद्मसिंग, आणि बादशाहाकडचा एक नरहरभट्ट ह्मणून होता, अशा तिघांच्या मार्फत बादशाहाकडे पाठविण्यांत आलीं. तेव्हां त्याप्रमाणें औरंगजेबानें ती यादी कबूल करून, आपल्या संमतीचा दर्शक असा त्या सलापत्रकावर पंजा मारिला व आपली [1]मंजुरी लिहून तें पत्र राण्याकडे परत पाठविलें. हा सर्व तहाचा योग जो घडून आला तो मोंगलांच्या विश्वासघातकीपणावरून तसा घडून यावयाचा नव्हे; पण, पुढें युद्धाच्या ऐन वेळेस जो संतत पाऊस लागला कीं, त्यामुळें रजपूत अगदीं त्रासून गेले; व इतक्यांतच, ज्याच्या हिमतीवर येवढालीं युद्धें चाललीं होतीं तो शूर राणा राजसिंग आपल्या अंगावरील जखमांनीं, व राज्यावर आल्यापासून त्याला एकसारखा त्रास सोसावा लागला त्यामुळें तो जो अगदीं श्रमून गेला होता त्या योगानें, त्याचा

"यादींत लिहिलेल्या आणि पद्मसिंग तोंडानें ज्या आपल्यास कळवितील त्या विनंत्या आपण "मान्य कराल.

" १ ली.—चितोड आणि त्याचे भोंवतालचा प्रदेश, जो मूळ रजपुतांनीं वसविला, तो सर्व "आमचा आह्मांस देण्यांत यावा.

" २ री.—हिंदूंचीं देवालयें आणि इतर पवित्र जागा, ज्यांचेमध्यें मुसलमानांनीं दांडगाईनें "मशिदी बांधल्या व ज्या जाग्यांचा उच्छेद केला, त्याविषयीं आतां आमचें कांहीं बोलणें नाहीं; "परंतु यापुढें असा प्रकार कोठेंही होऊं देऊं नये. अशा दांडगेपणाचा अगदीं मोड झाला पाहिजे.

" ३ री.—यापूर्वी राण्याकडून बादशाहाला जी मदत आणि साह्य होण्याचें ठरलें असून त्याप्रमाणें होत आलें, तसेंच साह्य यापुढेंही होण्याविषयीं इकडचें अभिवचन आहे. परंतु त्यापेक्षां "दुसऱ्या प्रकारचे जास्त हुकूम मात्र होऊं नयेत. आणि,

" ४ थी.—मयत राजा जसवंतसिंग याचे मुलगे आणि त्याच्या पदरचे लोक हे आपण होऊन "आपल्या राज्याचा कारभार पाहण्यासारखे झाल्याबरोबर त्यांचें राज्य (मारवाड) त्यांच्या स्वाधीन "होईल, अशी आह्मांस आशा आहे.

" आपल्याविषयीं आह्मांस जो आदर आणि जी सन्मानबुद्धि आहे, तिच्या योगानें आणखी "आपल्याजवळ कमी दर्जाच्या मागण्या करण्यास नकोच वाटतो. आपला सुदैवभास्कर नेहमीं ते-"जःपुंज राहून त्याच्या दीप्तीमुळें सर्व जगत् सुप्रकाशित असो. व त्या सुदैवभास्कराचें तेज दिवसें-"दिवस अधिकाधिक वृद्धिंगत होऊन, त्याची प्रभा कधींही अस्तंगत न होवो.

ही अर्जी लिहून पाठविणारे आपले नम्र सेवक,

**शूरसिंग आणि नरहरभट्ट.**"

१. कोणत्याही बादशाही लेखावर बादशाहानें आपला पंजा मारून त्याचे बाजूला 'मंजुरी' इतकीं अक्षरें लिहिलीं, ह्मणजे तो लेख बादशाहाचे हातचा दस्तैवज झाला, असें समजत असत.

याच वेळीं अंत झाला ! (वि० सं० १७३७ ह्मणजे इ० स० १६८१.) अशा कारणांनीं शेवटीं रजपुतांनीं तहाची योजनाच पसंत केली.

येथें शेवटीं, आणखी एकदां मेवाडचा मोठा स्वदेशाभिमानी राणा राजसिंग याच्या एकंदर कारकीर्दीकडे व वर्तनाकडे मागे उलटून पाहूं; व त्याच्यामध्यें आणि त्याचा कट्टा शत्रु जो औरंगजेब त्याचेमध्यें किती अंतर दिसतें तें बघूं. आतां, त्या उभय व्युत्क्रम स्वभावाच्या राजपुरुषांची तुलना करून पाहूं, असें ह्मणणेंच मुळीं गैर आहे असें दिसेल; तथापि, ह्या तुलनेंत त्या उभयतांच्या स्वभावव्युत्क्रमतेचें तर नीट परीक्षण होईल व तें तरी इतिहासदृष्टीनें एक कामच होईल. मोंगल बादशाह औरंगजेब हा अत्यंत अधमाधम आणि नीचवृत्तीचा होता हें त्याच्या कारकीर्दींत प्रतिपदीं दिसून येण्यासारखें आहे. इतिहासलेखक तर असें लिहितात कीं, याचेइतका दुष्ट, दुरात्मा, लोभी, हिंसक, क्रूर, निर्दय, आणि विलक्षण बादशाह आशियाखंडांतील कोणत्याही राष्ट्राच्या तख्तावर राज्याधिकारी ह्मणून झालेला नाहीं. कोणत्याही प्रसंगीं औरंगजेबाकडून थोरपणाचें, उदारतेचें व सुमनुष्यास शोभेल असें एकही कृत्य झाल्याचा दाखला सर्व इतिहासांत नाहीं. मनुष्य कसाही पापात्मा असला तरी, त्याचे ठायीं कृतज्ञता ह्मणून जो ज्ञानवान् जीवांत असणारा एक ईश्वरदत्त गुण असतो, त्याचादेखील त्याजमध्यें पूर्णपणें अभाव होता. त्यानें आपल्यावर उपकार करणाराचे कधीं आभार मानिले असल्याचें उदाहरण त्याच्या एकंदर इतिहासांत सांपडणें दुरापास्तच! तो असा कृतघ्न स्वभावाचा असे कीं, त्याच्या शत्रूंनींही त्याजवर उपकृति केली असल्यास ती तो बिलकूल न समजतां, ती त्यांची उपकृति फेडणें ह्मणजे, त्या उपकारी शत्रूंचा सर्वांशांनीं आणि मोठ्या कपटपाटवानें सत्यानाश करण्याविषयीं उद्युक्त असणें, हेंच तो आपलें कर्तव्य आणि थोरपण समजत असे! असला, घोर वनपशूहूनही नीचवृत्तीचा नराधम औरंगजेब हा मोंगलवंशांत जन्मास आला होता; व त्यानें मनुष्यस्वभावाच्या अत्यंत निंद्य व सदोष आचरणांची व कृत्यांची अगदीं कमाल करून सोडिली ! याविषयींचा खुलासा पाहणें तो या रजपुतांच्या इतिहासांतच कितीसा सांपडणार आहे ? त्याबद्दल खुद्द मोंगलांचाच इतिहास पाहिला पाहिजे; ह्मणजे त्यांत औरंगजेबाच्या एकंदर नीच व अधमाधम कृत्यांचा पूर्णपणें बोध होईल. तोच रजपूत राजांच्या मनाचा थोरपणा, त्यांचें उदारांतःकरण, त्यांचें सदसद्विवेकानुवर्तन आणि त्यांची सत्यनिष्ठा, हीं किती प्रशंसनीय व जागृत होतीं ? ऐन आणीबाणीच्या प्रसंगींही त्यांची शत्रूविषयीं निर्मत्सरबुद्धि, त्यांचें त्यांजविषयीं ममत्व व त्यांची शत्रूंच्या संकटसमयीं त्यांजवरील अनुकंपा, हे मनुष्याच्या सुशीलतेचे अत्यंत शिखराला पोंचलेले सद्गुण यांचें त्यांचेमध्यें पूर्ण वास्तव्य होतें, असें त्यांच्या प्रत्येक कृत्यांत स्पष्टपणें

कोणाच्याही नजरेस पडण्यासारखें आहे. आणि हे सर्व गुण, त्यांचेमध्यें शौर्य व पराक्रम हे जे वीराचे गुण ते पूर्णपणें असतां त्यांचे बरोबरीनेंच वसत होते, हें त्या त्यांच्या सद्गुणांची विशेष स्तुति आणि प्रशंसा करण्याला कारण आहे. आपला पुत्र मोठ्या शौर्यानें दुस्मानांचा सूड घेत व पराक्रम करीत मुलूखगिरीवर निघाला असतां, त्या मुलूखगिरीमध्यें त्या दुस्मानांना व त्यांचे प्रजेला फार त्रास होतो असा गवगवा कानावर आल्याबरोबर, त्या विजयी पुत्रास, एकदम पुढें न जातां परत येण्याचा हुकूम पाठविणारा, असा निरपेक्षबुद्धीचा व दयाळ राजा आढळणें, ह्मणजे कांहीं साधारण गोष्ट नव्हे ! राणा राजसिंग याचा थोरपणा आणि त्याचा सदाचार यांचेविषयीं भाटांनीं तर फारच स्तुति केली आहे. आणि तो तशा स्तुतीला पात्रही खराच. तसाच, आपल्या जातीची परंतु मोंगलबादशाहाची, ह्मणजे परधर्मांत गेलेली शत्रुस्त्री, आपल्या हातीं सांपडली असतां तिचा योग्य सन्मान ठेवून, तिच्या अब्रूस किंवा स्त्रीधर्मास स्पर्श न करितां, तिला तिच्या बादशाहपतीकडे निर्वेधपणें पोंचती करणारा, अशा कडक व्रताचा राजपुरुष असणें हें तरी कांहीं सामान्य उदाहरण नाहीं! तो जसा तरवारबहादूर होता तसाच कलमबहादूरही होता; हें, त्यानें औरंगजेबास जें पत्र लिहिलेलें मागें दिलें आहे, त्यावरून सहज समजण्यासारखें आहे. त्या पत्रावरून त्याचें शिक्षण, त्याचें न्यायानुवर्तन आणि त्याची प्रौढता व निर्भीडपणा हीं व्यक्त होण्यासारखीं आहेत. ह्याप्रमाणें तो, राजकुलीन पुरुषांमध्यें अवश्य असणाऱ्या गुणांत वर्णन करण्यासारखा राणा होऊन गेला, यांत संशय नाहीं. मात्र तो असावा त्यापेक्षां ज्यास्त दयाशील असल्यामुळें, न्यायनिष्ठुरतेनें एखाद्याच्या अमलाचें जें वजन आपल्या जवळच्याही लोकांवर असतें तसें त्याच्यानें राखतां आलें नाहीं, येवढाच काय तो त्याजमध्यें दोष होता, असें इतिहासलेखक ह्मणतात. व ह्मणूनच पूर्वीं, (पृष्ठ २२६) "त्याची स्वतःची वर्तणूक, आपल्याकडे सर्व अम्मल राखून सर्वांवर सारखा दरारा ठेवण्यासारखी नव्हती;" असें ध्वनित करण्यांत आलें आहे. यापेक्षां त्याजमध्यें दुसरा कोणताही दोष काढण्यास स्थल नाहीं. बरें, असा हा राणा केवळ आपल्या क्षात्रधर्मांत आणि राज्यकर्तृत्वांतच प्रशंसनीय होता असें नाहीं; तर त्याचें लोकोपयोगी कामांकडे आणि नवीन नवीन सुधारणांकडेही उत्तम रीतीनें लक्ष्य होतें, असें त्याच्या दुसऱ्या कृत्यांवरून दिसतें. याचे स्पष्टीकरणार्थ या भागाचे शेवटीं त्याच्या त्या लोकोपयुक्त कृत्यांचेंही थोडेंसें वर्णन जोडणें प्रासंगिक होईल असें जाणून, आह्मी तसें करितों. हें लोकोपयुक्त काम ह्मणजे, त्यानें बांधलेला 'राजसमुंद्र' नांवाचा विस्तीर्ण तलाव होय. हा तलाव त्यानें कोणत्या स्थितींत व कोणत्या उद्देशानें

बांधिला, याबद्दलची हकीकत दिली असतां त्याच्या राजकीय वर्तनाचें विशेष स्पष्टीकरण केल्यासारखें होणार आहे.

वर सांगितलेला 'राजसमुद्र' तलाव, ज्यास रजपूत लोक 'राजसमुंद' असें म्हणतात तो, राणा राजसिंग यानें आपल्या राजधानीचे पूर्वबाजूस १२ कोसांवर अरवली डोंगराचे पायथ्याशीं एक कोसावर एक मोठें विस्तीर्ण मैदान होतें तेथें बांधिला. त्या मैदानांतून गोमती नांवाची एक सर्पाकृति नदी अरवली डोंगरांत उगम पावून पुढें चालली होती. तिलाच आडवून, तेथें मोठा थोरला मजबूत बांध घातला आहे. व त्या बांधाच्या आंत हा तलाव झाला आहे. ह्या तलावाला चोहोंकडून सुंदर पांढऱ्या पाषाणांची पाळ बांधिली आहे. त्या तलावाला त्यानें आपल्या नांवानें युक्त आणि त्याच्या विस्तीर्णतेचें बोधक असें 'राजसमुद्र' हें नांव दिलें व तेंच अजून चालू आहे. ह्या तलावाचा बांध साधारणतः वर्तुलाकृति आहे व तें वर्तुल सुमारें दीड कोस लांबीचें आहे. वायव्य व ईशान्य या बाजू आणि उत्तर मर्यादा ह्या बाजूंकडे डोंगर असल्यामुळें तिकडे बांध घालण्याचें मुळींच प्रयोजन पडलें नाहीं. बांधाच्या आंत अतिशय खोल आणि औरस चौरस सहा कोसांचें असें हें 'राजसमुद्र' सरोवर झालें आहे. ह्या सरोवराला वर सांगितल्याप्रमाणें चोहोंकडून सुंदर पांढऱ्या पाषाणांची पाळ आहेच व त्या पाळीला तशाच दगडांच्या उतरत्या पायऱ्या आहेत; त्यामुळें उन्हाळ्यांत पाणी खोल गेलें तरी तें दगडी पाळीशींच नेहमीं खेळत राहून, पाण्याच्या कडेबरोबर दगडी पाळ असते. ह्या तलावाच्या भोंवतालीं उंच जमीन असून, मध्यें तो विस्तृत जलपृष्ठभाग दिसतो. ज्यानें हें सरोवर बांधिलें तो राजसिंग जर आणखी कांहीं दिवस वांचता तर, त्यानें ह्या तलावाचे भोंवतालच्या हल्लीं अगदीं उघड्या दिसणाऱ्या जमीनीवर सर्वत्र सुंदर व दाट झाडें व वृक्ष लावून वनछाया बनविली असती. ह्या तलावाच्या दक्षिण बाजूला राणा राजसिंग यानेंच वसविलेलें 'राजनगर' नांवाचें शहर व किल्ला आहे. आणि बंधाऱ्याचे वरच्या बाजूला कंकरोळीचें एक देऊळ बांधिलें आहे. श्रीकृष्णाच्या उभें राहण्याच्या आकारांवरून जीं त्याचीं सात प्रकारचीं रूपें मानलेलीं आहेत, त्या सात रूपांतील कंकरोळी नांवाचें एक रूप असून, त्या श्रीकृष्णाचें वरील देवालय आहे. ह्या देवळाचें काम फारच चांगलें व खोदींव असून, त्या काळीं त्या प्रकारच्या नक्षीचे कामांची किती सुधारणा झाली होती त्याचा तो एक उत्तम प्रकारचा नमुनाच आहे. ह्या देवळाच्या भिंतींवर राणा राजसिंग याच्या पर्यंतच्या सर्व राजपुरुषांच्या वंशावळी खोदल्या आहेत. वरील तलाव वगैरे करण्यास एकंदर ९६,००,००० रुपये राणा राजसिंग यास खर्च आला; व तो त्यानें, त्याच्या सरदारांनीं आणि दुसरे जे कोणी मातबर लोक होते त्यांनीं, वर्गणी जमवून भागविला.

ह्या येवढा खर्च करून राजसिंगानें हें काम केलें, व त्यामुळें त्या भागास मोठें सौंदर्य आलें ही गोष्ट तर खरीच आहे; परंतु ह्या इतका खर्च करण्याचें मूळ कारण काय, हें बघितलें ह्मणजे त्या कृत्याचें सौंदर्य आणि उपयुक्तता हीं द्विगुणित वाढलेलीं दिसतात. इतका मोठा खर्च करून हें काम करण्यास राणा राजसिंग याला असें कारण झालें कीं, राजपुतान्यांत अनेक प्रसंगीं जे मोठमोठे दुष्काळ व त्यानंतर पटकीचे उपद्रव हीं दोन ईश्वरी कोपाचीं भयंकर अरिष्टें गुदरतात, त्यांतीलच दुष्काळाचें एक मोठें अरिष्ट राजसिंगाचे कारकीर्दींत मेवाडप्रांतावर येऊन, लोक अगदीं अन्नान्नगत झाले होते. तेव्हां, त्या लोकांना कांहीं तरी उद्योग काढून त्यांच्या पोटापाण्याची सोय लावून देण्याची राण्यावर मोठी जबाबदारी होती; आणि ती जबाबदारी लक्षांत वागवून त्यानें वर लिहिलेल्या तलावाचें उपयुक्त काम काढिलें. कीं, पुन: जर कधीं दुष्काळ पडला तर ह्या विस्तृत तलावांतील पाण्याचा लोकांना यथेच्छ पुरवठा व्हावा. राजसिंगाच्या या योजनेवरून त्याची धर्मबुद्धि कशा प्रकारची होती हें तेव्हांच समजण्यासारखें आहे. धर्म करणें तो असा करावा कीं, ज्याला तो करणें आहे त्यास त्यापासून तत्कालीं उपयोग होऊन, त्यापासून पुढील संततीलाही संततचा उपयोग घडावा. आणि अशा प्रकारची ज्याची स्वाभाविक धर्मबुद्धि त्या माहात्म्याबद्दलची कितीही स्तुति केली तरी ती वाजवीच होईल, यांत संशय नाहीं. 'राजसमुद्र' ह्या तलाव बांधण्याचें हें मूळ कारण पाहिलें ह्मणजे, ज्या काळीं तो बांधिला त्या विलक्षण आणीबाणीच्या वेळीं त्याच्या बांधण्याचे कामावर असलेल्या लक्षावधि लोकांस जो उपयोग झाला, तो उपयोग त्या काळाचे पुढेंही अनंत काळपर्यंत लोकांच्या अनुभवास येईल, याविषयीं मुळींच संशय नाहीं. आणि ह्मणूनच वर लिहिल्याप्रमाणें, ह्या 'राजसमुद्र' तळ्याच्या प्रस्तुतच्या सौंदर्यांत त्याच्या मूळ कारणानें विशेष सौंदर्य भासमान होतें, असें आह्मी ह्मणतो[१].

वरील दुष्काळ ह्मणजे राणा राजसिंग हा गादीवर बसल्यानंतर सात वर्षांनीं (वि० सं० १७१७ किंवा इ० स० १६६१ या वर्षीं) मेवाड प्रांतांत पडला. आणि त्याचे दूरीकरणार्थ वर लिहिलेल्या तलावाला सुरुवात करण्याचा पहिला दगड, ज्योतिष्यांनीं

१. 'राजसमुद्रा'सारखीं सरोवरें गुजराथ व मेवाड प्रांतांत पुष्कळ असून, तीं मूळ बांधण्याचा उद्देश तरी, अशाच प्रकारचीं दुष्काळ वगैरेसारखीं संकटें दूर करण्याकरितां ह्मणून असावा, असें वाटतें. प्रांतेज येथील भोंक व ढेबर नांवाचे तलाव, विरमगांवचा मुन्सर तलाव, अहमदाबादचा कांकरिया तलाव, डाकूरचा सूरसागर तलाव वगैरे सरोवरें फार मोठालीं आणि प्रसिद्ध आहेत. अहमदाबादच्या कांकरिया तलावाची दुरुस्ती तेथील कलेक्टर आ० बारोडेल यांच्या कारकीर्दींत म्युनिसिपालिटीनें एक लक्ष रुपये लावून केल्यामुळें तो तलाव पाहण्यासारखा झाला आहे.

सुमुहूर्त आणि सुदिन सांगितल्यावरून, पौष शुद्ध ८, मंगळवारीं, बसविण्यांत आला. आलेल्या दुष्काळव्याळांतून आपली प्रजा कशी वांचेल व तिचा निर्वाह कसा चालेल याबद्दलची राणा राजसिंग यास मोठी चिंता पडली होती. तितक्यांत त्यास आपलें नांव कायम करण्याची व त्यामध्येंच रयतेचा परामर्ष घेण्याची बुद्धि सुचली; आणि त्यानें वर सांगितलेला तलाव बांधण्यास सुरुवात केली. तें काम एकसारखें सात वर्षेंपर्यंत चाललें होतें. व त्याच्या प्रारंभीं व अखेरीस राण्यानें हिंदू रीतींप्रमाणें सर्व प्रकारचीं होमहवनें, बलिदान आणि दुसरीं शांतिस्वास्थ्य प्राप्त होण्याकरितां करावयाचीं जीं कर्मे तीं करून, ब्राह्मणांचा व देवाचा आशीर्वाद घेतला.

राणा राजसिंग याचे कारकीर्दीवर भाटांनीं जो पद्यग्रंथ लिहिला आहे, त्याचें नांव 'राजविलास' असें असून, त्यामध्यें त्याच्या कारकीर्दीतील भयंकर दुष्काळाचें वर्णन फारच करुणोत्पादक दिलें आहे:—"आषाढाचा महिना संपून गेला तरी पर्जन्याचा बिंदु पडला नाहीं; आणि याचप्रमाणें श्रावण व भाद्रपद हेही पावसाळ्यांतले मुख्य दोन महिने अगदीं कोरडे ठणठणीत गेले; तेव्हां, सर्व जग जसें खायाला उठलें! हें महासंकट जाणून, राणा राजसिंग हा आपली कुलस्वामिनी चतुर्भुजा देवी इचे देवालयांत जाऊन, त्यानें तिची प्रार्थना केली कीं, 'हे जगदंबे, सर्व जीवजंतूंची काळजी तुला आहे! त्यांचें रक्षण करणार तूंच समर्थ आहेस!' परंतु ईश्वरच कोपला; तेथें नुसत्या प्रार्थना काय करणार? अवघें जग क्षुधेनें पीडून, सर्व लोक अन्नान्नगत झाले! क्षुधेची शांति करण्याकरितां, कधीं कोणीं ज्यांच्याकडे ढुंकूनही बघितलें नाहीं असे पदार्थ लोकांनीं भक्षावे. आई, बाप, बहीण, भाऊ, नवरा, बायको वगैरे मनुष्यांचीं परस्पर नातीं हीं दरोबस्त एकीकडे राहून, कोणीच कोणाविषयीं पर्वा बाळगीनासें झालें. ज्याला त्याला आपलें पोट जड झालें; तेव्हां, इतरांची काळजी आणि मायाममता बाळगण्याचें कोणाला सुचणार? फार तर काय, पण आईबापांनीं आपलीं पोरें देखील विकलीं! जो जो दिवस उजाडावा तो तो अत्यंत भयंकर असा प्रत्येकास दिसावा! प्रतिदिवशीं दुष्काळाचें पाऊल आपलें पुढें! लहानसहान आणि बारीकसारीक असे एकंदर जीवजंतुदेखील मृत्यु पावले! ते तरी वांचतात कशानें? त्यांना खायाला काय होतें? सर्व वयाचे हजारों लोक क्षुधादेवतेला बळी पडले! एका भुकेला पुरेसें अन्न दोन दोन तीन तीन भुकांना पुरवून लोक खाऊं लागले; परंतु अशानें काय होणार? सर्वदा पश्चिमेकडचा उष्ण वारा वाहून सर्व पृथ्वी अगदीं तप्त होऊन गेली! त्यामध्येंच पटकीसारखे भयंकर रोग उद्भवले! मग काय विचारावयाचें आहे? रात्रीं, निरभ्र आंकाशांत तारागण चकचकीत दिसावा! रात्रदिवसाच्या कोणत्याही काळांत आकाशामध्यें ढगाचा एक बिंदुही दिसत नव्हता! मग विजेचें

चमकणें आणि मेघगर्जना यांची कल्पना तरी कशाला? अशा वर्षर्तूमध्यें असे कोरडे दिवस, ह्मणजे जगाची काय स्थिति असावी? नद्या, तळीं, विहिरी, वगैरे सर्व कोरडीं शुष्क होऊन पडलीं! मोठमोठ्या धनिकांची आणि अठराविस्वे दरिद्र असलेल्यांची एकच स्थिति होऊन गेली! ब्राह्मणांनीं आपलीं कर्मे सोडलीं. चारही वर्ण एकंकार होऊन, त्यांच्यांमध्यें परस्पर ज्ञातिबंधारण मुळींच राहिलें नाहीं! शूद्र कोणता व ब्राह्मण कोणता हें मुळींच ओळखूं येईनासें झालें! 'सर्वारंभास्तंदुलाः प्रस्थमूलाः' हें जें तत्व, त्याजकडे सर्वांचें पाहणें! मनुष्यमात्राची शक्ति, विचार, शहाणपणा, कसब, युक्ति, धर्म, आचार, हीं सर्व एका बाजूला राहून, जो तो पोटाच्या विवंचनेंत अगदीं बुडून गेलेला दिसे! कोणाच्या तोंडावर उत्साह किंवा कळा हीं दिसेनाशीं होऊन, जिकडे तिकडे मूर्तिमंत बुभुक्षितत्व दृष्टीस पडूं लागलें! जातिवर्णविचार आणि तत्संबंधाचे अभिमान हे क्षुद्वेदनाग्नीमध्यें जळून, करपून व भाजून ठार झाले! सर्व भूप्रदेशावर कोठेंही ओलसर वृक्ष, पर्ण, पुष्प, लता, वल्ली, वगैरे दिसेनाशीं झालीं! तीं गेलीं कोठें? तीं सर्व मनुष्यांच्या भक्ष्यस्थानीं पडलीं! लोकांनीं झाडाच्या सालीदेखील सोलून खाल्लया! मनुष्याला मनुष्यानें खाण्याचा प्रसंग आला! सर्वत्र उदास आणि भणभण दिसूं लागलें! शहरें व गांवें सर्व उद्ध्वस्त पडलीं! जेथें कोठें कांहीं खाण्याचा सुगावा लागेल तिकडे लोक धांवूं लागले. ज्यांस अन्नानें ह्या संकटाचें निवारण करण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं त्यांनीं तर आत्महत्या करून घेतल्या! मोटमोठीं घराणीं देशोधडीस लागलीं! बहुत कुटुंबे तर निर्वंश झालीं! जलचर, स्थलचर, आणि व्योमचर असे मनुष्यांवांचून प्राणी दृष्टीस पडेनासे झाले! सर्व लोकांच्या आशा अगदीं नष्ट झाल्या! सर्व पृथ्वी निःसत्व होऊन मृत्तिकावशिष्ट राहण्याचीं सर्व चिन्हें दिसूं लागलीं!" ह्या प्रकारचें अगदीं साधें तरी अत्यंत भयकरुणोत्पादक असें त्या वेळचें हें दुष्काळवर्णन वाचून, कोणत्याही काळच्या वाचकांस खरोखर दुःख वाटल्यावांचून राहणार नाहीं. अशा वेळीं कशाही धैर्याचा व हिंमतीचा मनुष्य असल्यावर त्याचा काय उपाय चालणार? ईश्वरी क्षोभच जेथें झाला तेथें मानवांचे प्रयत्न ते कितीसे पुरे पडणार? हें उघडच दिसतें. तथापि, ज्याच्याकडे राज्यकर्तृत्व आणि प्रजारक्षणाच्या जबाबदारीचा भाग असतो त्यानें, अशा वेळीं श्रम आणि खर्च यांजकडे न बघतां आपल्या देशांतील लोकांच्या निर्वाहाकडे, आपल्या शक्तींत असणाऱ्या सर्व तजविजी आणि योजना केल्या पाहिजेत, हा त्याचा धर्म होय. तो धर्म जे बुद्धिमान् आणि प्रजारक्षणतत्पर राजे सर्व प्रकारचीं धोरणें ठेवून पाळतात, ते, राणा राजसिंगासारखे आपलीं नांवें आणि आपल्या कीर्ति 'यावच्चंद्रदिवाकरौ' अशा अजरामर क-

रून, नंतर देह विसर्जन करितात. वर लिहिल्या प्रकारच्या संकटांत मोठ्या मिजास-बारीनें आणि होईल तितक्या रीतीनें, ज्या राण्यानें राजसमुद्र तलावासारखें भक्कम व अवाढव्य काम काढून, त्या कामावर रयतेचें पोषण केलें व तिला दुष्काळांतून निभावून घेऊन, नंतर औरंगजेबासारख्या दुष्ट, निर्दय, अमानुष आणि अविचारी मोंगल बादशाहाशीं मोठ्या नेटानें टिकाव धरिला, हें राजसिंगाचें सामर्थ्य असाधारण होतें, यांत संशय नाहीं. ह्या रजपूतराजानें प्रजारक्षणसंबंधानें अत्यंत दयालुतेचीं कामें करून जें वीर्यशौर्य दाखविलें त्याच्या सत्कृतीमुळें मोंगलबादशाहास तर त्यानें केवळ लाजविलें, असें हिंदु व मुसलमान असे दोन्ही प्रकारचे इतिहासलेखक ह्मणतात; हें भूषण तरी राणा राजसिंग यास सामान्य नाहींच. सारांश, नांव घेण्यासारख्या अशा उत्तम राजमालिकेंतील हा राणा एक बहुमोल मणि मेवाडच्या इतिहासांत इतिहासलेखकांकडून वर्णिला गेला व त्याचें सत्कुल अधिक सुशोभित व दीप्तिमान झालें, यांत संदेह नाहीं.

---

## भाग बारावा.

## राणा जयसिंग.

राणा जयसिंग.—तो आणि त्याचा सावत्र भाऊ यांचा एककाळीं जन्म झाला त्या संबंधाची गोष्ट.—जयसिंग राणा आणि शाहजादा अजीम यांचीं बोलणीं चालतात.—तह.—त्यांचा पुन: बेबनाव.—राणा जयसमुद्र (जयसमुंद) नांवाचें सरोवर बांधितो.—कुटुंबकलह.—गादीचा वारसदार उमरावसिंग हा बंड करितो.—राणा जयसिंग याचा मृत्यु.—उमरावसिंग राणा होतो.—औरंगजेबाचे मुलाबरोबर त्याचा तह.—यावेळीं घडलेल्या गोष्टींच्या संबंधानें विचार.—जेजिया किंवा डोईपट्टी या कराचें स्थापन.—बादशाही अमलापासून रजपूत दूर होतात.—त्याचीं कारणें.—औरंगजेबाचा मृत्यु.—बादशाहीकरितां भांडणें.—बहादूरशाह हा बादशाह होतो.—शिखलोक स्वतंत्र होतात.—मेवाड, मारवाड आणि अंबेर येथील तिन्ही राजे एक होतात.—ते लढाया सुरू करितात.—बहादूरशाह बादशाहाचा मृत्यु.—फिरोकशीर हा तख्तावर बसतो.—तो मारवाडच्या राजकन्येबरोबर लग्न करितो.—हिंदुस्थानांत इंग्रजांचा मूळ प्रवेश.—राणा उमरावसिंग हा बादशाहाबरोबर तह करितो.—जाट लोक स्वतंत्र होतात.—राणा उमरावसिंगाचा मृत्यु.—त्याच्या गुणस्वभावाचें वर्णन.

राणा राजसिंग मेल्यानंतर त्याचा मुलगा जयसिंग हा मेवाडचा राणा झाला. हें वर्ष वि० सं० १७३७ ह्मणजे इ० स० १६८१ हें होतें. राणा जयसिंग याचे जन्मकाळीं एक चमत्कारिक गोष्ट घडली ती आह्मी येथें सांगतों. त्या गोष्टीवरून रजपूतवंशांतील एक विशेष रीतीची किंवा आचाराची माहिती होईल. हा राणा ज्या वेळीं जन्मला त्याच वेळीं, परंतु थोडीशी अगोदर, त्याची दुसरी एक सावत्र

आई प्रसूत होऊन तिलाही एक मुलगा झाला. मेवाडच्या राजघराण्यांत अशी एक चाल आहे कीं, जो मुलगा पहिल्यानें जन्मतो त्याच्या दंडाला 'अमरधव' नांवाची एक मुळी असते ती त्या मुलाचे बापानें आपल्या हातें बांधावी. व याप्रमाणें ती मुळी त्याचे दंडाला बांधिली ह्मणजे तो मुलगा गादीचा मालक व्हावयाचा असें समजत. ती मुळी पौष्टिक असून, कशाही उन्हाच्या तापानें ती सुकत नाहीं, अशी तिची ख्याति आहे. राणा जयसिंग याचा बाप राणा राजसिंग यानें, ह्या सांगितलेल्या रीतीप्रमाणें, ती 'अमरधव' मुळी पहिल्यानें, जयसिंगाचेच दंडाला बांधिली. परंतु तसें व्हावयाचें नव्हतें. कारण, जयसिंगाचे अगोदर त्याचा दुसरा भाऊ भीमसिंग हा जन्मला होता. ह्मणजे, वडीलपणाचें नातें भीमसिंगाकडे असून, खरें ह्मटलें असतां 'अमरधव' मुळी राणा राजसिंग यानें भीमाचेच दंडाला बांधावयाची. ही चूक त्याच वेळीं तेथें असलेल्या लोकांचे लक्ष्यांत आली. परंतु भुलीनें राण्याकडून असें झालें असावें असें लोकांस वाटलें. पण ह्या कामांतील राण्याची ती भूल नव्हतीच. त्यानें तसें मुद्दाम केलें. राजसिंग राणा याची प्रीति भीमसिंगाचे आईपेक्षां जयसिंगाचे आईवर विशेष असून, तिला जें प्रिय तें करणें ह्याला इष्ट होतें; ह्मणून, त्याप्रमाणें त्यानें करून, आपले पश्चात् जयसिंग हाच गादीचा मालक व राणा व्हावयाचा, असें वरील मूलबंधनानें दर्शित केलें. पुढें तीं मुलें मोठीं होऊन वयांत आलीं तेव्हां, राणा राजसिंग यास चिंता पडली कीं, न जाणो, राज्यलोभानें व आपला हक्कसंबंध लक्ष्यांत आणून भीमसिंगाकडून आपला सावत्र भाऊ व गादीचा वारस होणारा जयसिंग याचे विरुद्ध कांहीं तरी कुरापत निघून त्याच्या नाशास तो प्रवृत्त होईल! ह्या पुढें होणाऱ्या सर्व गोष्टी लक्ष्यांत आणून, एके दिवशीं, राणा राजसिंग यानें आपली तरवार म्यानांतून काढून भीमसिंगाचे हातांत दिली; आणि त्याला सांगितलें कीं, 'पुढें तूं आपल्या सावत्र भावाबद्दल मनांत वैषम्य बाळगून त्याच्या नाशास आणि राज्यांतील अशांतीस कारण व्हावें त्यापेक्षां, हीच तरवार घेऊन माझ्या देखतां तूं आपल्या भावावर चालीव.' बापाचे हे शब्द ऐकतांच त्याचा उद्देश भीमसिंग समजला. परंतु तो मोठा उदार बुद्धीचा व थोर मनाचा असल्यामुळें त्यानें प्रिय पित्याची भीति घालविण्याकरितां त्याच्या गादीचीच आण घेऊन आपली निरपेक्षा प्रदर्शित केली; इतकेंच नव्हे, तर, आपला भाऊ जयसिंग याला गादीवर बसविण्याची जी योजना केली आहे ती आपल्याला अगदीं संमत आहे, अशी बापाची खात्री करण्याकरितां त्यानें अशी प्रतिज्ञा केली कीं, 'यापुढें मी या दोबारीच्या आंत पाणी पिईन तर आपल्या पोटचाच नव्हें!' आणि अशी प्रतिज्ञा करून लगेच तो आपले जे कोणी विश्वासाचे व अनुयायी लोक होते त्यांस बरोबर घेऊन, आपला जिकडे भाग्योदय

होणें असेल तिकडे जाण्याकरितां उदेपुराहून निघाला. त्या दिवशीं ऊन फार लागत असून, त्याचा जीव त्या उन्हाळ्यानें अगदीं गदमदून गेला. ह्याप्रमाणें तो दोबारीपर्यंत गेल्यानंतर त्यानें तेथें एका उच्च व दाट छायेच्या वटवृक्षाखालीं अंमळसा मुक्काम केला व आपल्या जन्मभूमीचें एकवार शेवटचें दर्शन घेऊन नंतर पुढें चालूं लागावें असा त्यानें बेत केला. इतक्यांत त्याच्या एका शागीर्दानें भीमसिंगाला ताज्या व गार पाण्याचा एक रुप्याचा प्याला भरून पिण्याकरितां आणून दिला व भीमसिंग अतिशय तृषाक्रांत झाला असल्यामुळें त्याणेंही तहान भागविण्याकरितां तो प्याला घेऊन आपल्या ओंठाशीं लाविला. इतक्यांत त्याला स्मरण झालें कीं, 'मी ह्या दोबारीच्या आंत असेंपर्यंत जलप्राशन देखील करणार नाहीं अशी शपथ घेतली आहे; व मी तर अजून त्या बारीच्या आंतच आहें. तेव्हां माझें हें करणें आपल्या प्रतिज्ञेचा भंग करितें, हें चांगलें नव्हे.' असा विचार करून, त्यानें त्या प्याल्यांतलें पाणी ईश्वराच्या नांवानें जमिनीवर ओतिलें; आणि तो प्याला ज्या झऱ्यांतून तें पाणी आणिलें होतें त्या झऱ्यांतल्या जलदेवतेला अर्पण होण्याकरितां ह्मणून त्यानें तो त्या झऱ्यांत फेंकून दिला. नंतर त्यानें आपल्या जन्मभूमीच्या बारीला नमस्कार करून तेथून पुढें प्रयाण केलें. पुढें तो बहादूरशाहाकडे गेला; तेव्हां त्यानें त्याला आपलेजवळ ठेवून घेऊन, त्यास साडेतीनहजार स्वारांच्या मुखत्यारीची मनसब करून दिली, व त्यांच्या तैनातीस बावन्न गांवांचा मुलूख दिला. परंतु पुढें त्याचा आणि बादशाहाचे सेनापतीचा कांहीं बेबनाव होऊन, बादशाहाकडून त्याची योजना सिंधुनदाच्या पश्चिमेकडील मुलखांत झाली, ह्मणून तो तिकडे गेला, व तिकडेच तो मृत्यु पावला.

---

१. भीमसिंगानें जेथें पाणी न पितां आपला रुप्याचा प्याला झऱ्यांत झुगारून दिला ती जागा, हा मूळग्रंथ लिहिणारा टॉड् ह्मणतो, मीं बघितली असून चितोडच्या किल्ल्यावरील मंडपाखालीं आह्मी बसून भोंवतालीं मेवाडच्या मैदानाकडे दृष्टि द्यावी व त्या जुन्या राजवंशांतून शिलक राहून आमच्या बरोबर असलेला बनेरा येथील राजा यानें आपल्या पूर्वजांच्या अनेक मनोरंजक व आश्चर्यचकित करून टाकणाऱ्या गोष्टी सांगाव्या. ज्या झऱ्यांत भीमसिंगानें आपला प्याला फेंकून दिला त्या झऱ्यावर जाऊन कित्येक वेळां मीं आपली तहान भागविली आहे. त्या झऱ्याचे भोंवतालच्या प्रदेशाकडे नजर फेंकली ह्मणजे आणि त्या जुन्या गोष्टी ऐकिल्या म्हणजे आपल्या चित्ताची स्थिति कांहीं विलक्षण होऊन जाते!

२. भीमसिंगाच्या मरणाला विलक्षणच कारण झालें. तो, त्याच्या पाठीचा कणा मोडून व खवाटे उखळून मेला. तो मोठा शक्तिमान्, चपल, घोड्यावर बसणारा वस्ताद आणि साहसी असे. त्यानें घोड्यावर बसून घोडा भरधांव फेंकावा; आणि एखाद्या वृक्षाखालून जातां जातां सहज व झट्दिशीं त्या वृक्षाची फांदी कवटाळून धरून मांडीखालचा घोडा, त्याच वेगानें जाण्याकरितां मांडींतून सोडून द्यावा व आपण त्या खांदीला तसेंच लोंबकळत रहावें! ह्या चमत्कारिक कसर-

ह्याप्रमाणें भीमसिंगाची ती अवस्था झाली. इकडे जयसिंग हाच पुढें आपल्या बापाचा वारसदार ह्मणून मेवाडच्या गादीवर बसला. नंतर त्यानें, औरंगजेबाशीं तह करण्याचें जें पूर्वीपासून घांटत होतें त्याप्रमाणें तह करून, रजपूत व मोंगल यांच्यामधील लढाई व कलह बंद पाडले. हा तह औरंगजेबाचा मुलगा सुलतान अजीमखान व सरदार दिल्हेरखान यांच्या मध्यस्थीनें पार पडला. व तो तह कायम रहावा ह्मणून राणा जयसिंग यानें दिल्हेरखानाचे मुलगे ओलीस घेतले होते. रजपूत राण्याच्या थोरपणाचा आणि औदार्याचा अनुभव सुलतान अजीम व सरदार दिल्हेरखान यांस, मागें अरवली डोंगराच्या खिंडींत राणा राजसिंग याचे फौजेनें मोंगलांस कोंडमारा करून मारण्याचा बेत केला असतां, राण्याला दया येऊन त्यानें तो कोंडमारा उठविला व त्यामुळें आपला बचाव झाला, ती गोष्ट चांगली स्मरत असून, त्याबद्दल ते राण्याचे फार उपकार मानीत होते. मोंगलांचा व राण्याचा तहनामा व्हावयाचा तो समारंभ फारच प्रेक्षणीय झाला. राण्याच्या बरोबर त्याचे दहाहजार घोडेस्वार आणि चाळीसहजार पायदळ, शिवाय हजारो डोंगरी भील वगैरे लोक तो समारंभ बघण्यास जमले होते ते, असे मिळून एकंदर एक लाख मनुष्यांचा समाज त्या ठिकाणीं हजर होता. ज्या ठिकाणीं आपण मोंगलांशीं युद्ध करून त्यांचे अनेकवार पराभव केले, व जेथें रक्तपाताशिवाय दुसरें कांही एक काम नसावयाचें; त्याच रणभूमीच्या विस्तृत मैदानांत, उभय पक्षाचे लोक शांतिसमाधानानें एकत्र जमून, परस्परांमधील ऐक्य दृढतर करण्याकरितां उत्सुक झाले आहेत असें आढळल्यावरून, रजपूतपक्षास मोठा आनंद होऊन, त्यांनीं त्या वेळीं आनंदाच्या आरोळ्या माराव्या व तें सर्व मैदान त्या गर्जनांच्या प्रतिध्वनीनें नादित करून द्यावें ! त्या मैदानांत अजीम व दिल्हेरखान हे आल्यानंतर, त्यांस पूर्वीची वर सांगितल्या प्रकारची व त्याच ठिकाणीं भोगिलेली विपत्ति व संकटें आणि त्यांतून राणा राजसिंगानें केलेली आपली मुक्ति हीं आठवून, त्यांचें हृदय आनंदोद्गारानें व कृतज्ञतादर्शनानें अगदीं भरून आलें. सुलतान अजीम यानें तहनाम्यावर आपल्या बापाचे वतीनें सही करण्यापूर्वी मोठ्या गंभीर स्वरानें भाषण करून जमलेल्या समाजांत असें सांगितलें कीं, 'राण्याच्या वंशाचा थोरपणा आणि शौर्यवीर्यादिगुण यांविषयीं आह्मीं अजाण नसून त्यांचेविषयीं आमची पूर्ण खात्री आहे.' ह्याप्रमाणें अजीमानें सही केल्यानंतर, राणा जयसिंग यानें बादशाहीचा मान व डौल राखण्याकरितां व मोंगल बादशाहाचे

---

वीचा त्याला फार नाद असे व त्याप्रमाणें तो ती कसरत नेहमीं करीत असे. परंतु, एके वेळीं त्यानें ह्याप्रमाणेंच केलें तेव्हां, वर लिहिल्याप्रमाणें त्याचे खवाटे उखळून तो त्या उंच खांदीपासून सुटून खालीं पडला व त्याच्या पाठीचा कणा मोडून त्या योगानें त्याचा अंत झाला.

विरुद्ध त्याचा मुलगा अकबर याला त्याचे बंडांत साह्य केल्याबद्दलचा नांवाला दंड ह्मणून तीन सुभे मोंगलांचे स्वाधीन केले. त्याचप्रमाणें, बादशाहाला ह्या तहापासून समाधान वाटावें यासाठीं राणा जयसिंग यानें आपला व मोंगलांचा स्नेह झाल्याचें दर्शक ह्मणून, तहापूर्वी पूर्ण स्वातंत्र्यद्योतक असा जो आपल्या तंबूचा व राजच्छत्राचा किरमिजी रंग होता तो, तह झाल्यानंतर बदलून टाकून, बादशहाचें वर्चस्व आपल्याला पूर्णपणें मान्य असल्याचें दाखविलें. ह्याप्रमाणें मोंगलांना समाधानावह जें जें करणें इष्ट व आवश्यक होतें तें तें राणा जयसिंग यानें केलें. तेव्हां, मोंगलांचे विषयींही राण्याला खात्री वाटून, झालेल्या तहनाम्यावर त्यानें पूर्णपणें विश्वासावें ह्मणून आणि हा तह व त्यांतील कलमें पूर्णपणें अमलांत रहावीं याजबद्दलची राण्यानें खात्री बाळगावी याकरितां, सरदार दिल्हेरखान यानें वर सांगितल्याप्रमाणें आपले मुलगे राण्याजवळ ओलीस ठेविले. आणि तहसंबंधी सर्व समारंभ खलास होऊन, दोन्ही पक्ष एकमेकांचा निरोप घेऊन विभक्त होण्याचे वेळीं सरदार दिल्हेरखान यानें स्नेहपूर्वक आणि विनोद व गांभीर्य यांहीं युक्त असें भाषण केलें कीं, 'राणेसाहेब, आपले सरदार दांडगे व हुच्चभाई आहेत; आणि माझीं मुलें मी आपले स्वाधीन ओलीस ह्मणून करतो. तेव्हां, त्यांच्या जीवाला जर कांहीं अपाय झाला तर मग मी आपला सर्व देश काश्मीज करून येथे मोंगलाई माजविण्यास कधींही कमी करणार नाहीं. यासाठीं आपलें मन शांत ठेवा. दुसऱ्यांच्या चेतवणीनें भलतेंच कांहीं होऊं देऊं नका. कारण, हें जे मी आपल्यास सांगतो तें केवळ प्रस्तुतच्या प्रसंगावरूनच सांगावयाचें असें नसून, आपल्या वडिलांचा व माझा स्नेह होता, त्या संबंधानें आपल्या हिताचें तें आपल्यास मला सांगितलें पाहिजे. व तो स्नेह आपणही लक्षात वागविला पाहिजे.'

वरील सर्व हकीकतीवरून, मोंगल व रजपूत यांचेमध्यें स्नेहसंबंध राहून त्यांनीं परस्परांशीं द्वेष, युद्धें आणि तज्जन्य रक्तपात करूं नयेत अशाविषयीं मोंगलांचा बिचारा सरदार दिल्हेरखान याचें फार लक्ष्य असे, व त्यासाठीं तो आपल्याकडून होईल तितका जपत असे, असें दिसतें, ह्या सर्व गोष्टी खऱ्या. दिल्हेरखान याचे हेतु फार चांगले व हिताचे होते व त्याप्रमाणें राणा जयसिंग हा वागण्यास चुकतामा. परंतु पुढें पांच वर्षें झालीं नाहींत तोच, राण्याला मोंगलांशीं सामना करण्यास, व जेथें पूर्वी शांततेचा तहनामा होऊन परस्परांची दोस्ती झाली त्याच रणभूमीचे मैदानांत तरवार घेऊन उभे राहण्यास मोंगलांनीं भाग पाडलें. त्यास त्याचा नाइलाज होता. त्याला पुढें एकसारखें मोंगलांशीं हळू हळू झुंझावें लागे. तरी त्यानें, शांतीची वेळ ह्मणून जीं कामें अगोदर सुरू केलीं होतीं तीं, लढायांचीं संधानें संभाळूनही,

तशींच अव्याहत सुरू ठेवून शेवटास नेलीं. ह्या कामांतील एक मोठें व सर्वोपयुक्त असें काम ह्मटलें तर, त्यानें आपलें नांव चिरकाल रहावें ह्मणून, आपल्या नांवानें बांधलेलें एक विस्तृत सरोवर होय. त्यानें दोन डोंगर बघून त्यांच्यामध्यें एक भक्कम बांध घातला व त्या बांधानें त्या दोन्ही डोंगरांतून जे अखंड जलप्रवाह चालत असत ते आडवून, एक मोठें विस्तृत सरोवर बनविलें. हिंदुस्थानांत जीं मोठालीं सरोवरें आहेत त्या सर्वांमध्यें हें एक अतिशय मोठें सरोवर आहे. या सरोवराचें नांव 'जयसमुद्र' असें ठेविलें. या नांवांत आपल्या नांवाचा समावेश करून, शिवाय आपल्या विजयाचाही त्या नांवांत बोध व्हावा, असा राणा जयसिंग याचा हेतु होता. ह्या 'जयसमुद्रा'स, पूर्वभागांत सांगितलेल्या 'राजसमुद्रा'प्रमाणेंच 'जयसमुंद' असें ह्मणतात. रजपुतांत 'समुद्रा'ला 'समुंद' ह्मणतात हें पूर्वी सांगितलेंच आहे. ह्या 'जयसमुंदां'त बाराही महिने अथांग पाणी भरलेलें असतें. हा 'जयसमुंद' खरोखर एक समुद्रच असून, त्याचा विस्तार औरसचौरस १५ कोसांचा आहे. हें सरोवर बनविलें त्यापूर्वी तेथें एक ढेबर या नांवाचा लहानसा तलाव होता. त्या छोट्याशा तलावाचे जागीं हा 'जयसमुद्र' बनल्यावर त्याच्या पाण्यापासून आसपासच्या प्रांतांत फार उपयोग होऊं लागला. जिकडे तिकडे शेतकीच्या कामाला 'जयसमुद्र' पाणी पुरवूं लागला. 'जयसमुद्रा'च्या पाण्यावर मुख्यत्वें भात फार पिकतें. या सरोवराचे कांठीं राणा जयसिंग यानें आपल्या कमलादेवी राणीसाठीं एक सुंदर महाल बांधिला. ही राणी त्याच्या अत्यंत प्रीतींतली होती. ती प्रमारकुलांतली राजकन्या असून तिचें प्रसिद्ध नांव 'रूता राणी' ह्मणजे 'आवडींतली राणी' असें होतें.

कोठेंही पाहिलें तरी कुटुंबकलह हे असावयाचेच. त्यांपासून अगदीं सुटून शांतिसमाधानांत आयुष्याचे दिवस घालविणारे असे भाग्यशाली कुटुंबवत्सल लोक या जगावर फारच थोडे असतील. तेव्हां, राणा जयसिंग तरी या सार्वत्रिक स्थितीला अपवादक कां असेल? त्याची, राणी कमलादेवी इच्यावरच विशेष प्रीति असल्यामुळें त्याची दुसरी बायको जी बुंदीची राजकन्या होती तिच्या व तिचा मुलगा उमराव यांच्या मनांत विषमभाव उत्पन्न होऊन, तीं दोघें मातापुत्र राणा जयसिंग व त्याच्या जीवाची कलिजा जी राणी कमलादेवी यांस ब्रऱ्या रीतीनें पाहतनाशीं झालीं. युवराज उमरावसिंग हाच काय तो जयसिंगाच्या मागून मेवाडच्या गादीचा वारस असून, त्याचें व त्याच्या आईचें मन जेव्हां राण्याविषयीं व त्याच्या प्रीतिपात्र राणीविषयीं कलुषित झालें, तेव्हां त्याचा परिणाम चांगला व्हावयाचा नाहीं, असा लोकांचा साहजिकच तर्क झाला. ज्या राजघराण्यांत सापत्नभावजन्य मत्सराग्नि पेटत चालतो

त्या राजघराण्यांतली पूर्वीची शांतता, एकवाक्यता, लौकिक, वैभव, शौर्य इत्यादि गुणही होरपळत जातात, अशीं इतिहासांत अनेक उदाहरणें आहेत. ज्या देशांत अनेक बायका करण्याची राजे लोकांस मुखत्यारी आहे त्या देशांत असे सापत्नभाव आणि हेवेदावे व मत्सर हे त्या मुखत्यारीबरोबरच जन्मास आले आहेत असें समजावें; व त्यांचा परिणाम, मोठमोठ्या लढायांनीं जीं नुकसानें व्हावयाचीं नाहींत अशा प्रकारचीं नुकसानें झाल्याचीं उदाहरणें इतिहासांत कमी आढळावयाचीं नाहींत. दुसरी अशी एक इकडील राष्ट्रांत चुकीची गोष्ट घडते कीं, राजाच्या वारसदारांकडे, राजा कायम असेपर्यंत राजकीय कारभारांतील कोणताही अधिकार देण्याची वहिवाट नसल्यामुळें, ते राजपुत्र पुढें जसजसे जाणते होत जातात तसतसे ते आपल्या हातांत राजसत्ता आणण्याचे भलभलते प्रयत्न करून आपल्या राजकुलावर भयंकर अनर्थ आणितात, ह्या गोष्टीही कोणास खोट्या वाटतील असें नाहींच. तेव्हां, ह्या सर्व अनिष्ट परिणामाचीं दुष्ट चिन्हें राणा जयसिंग याचे कारकीर्दीत त्याचा मुलगा उमरावसिंग याजकडून दिसूं लागलीं, यांत आश्चर्य नाहीं.

राणा जयसिंग हा पहिल्यानें मोठा शूरवीर आणि राज्यकर्तृत्वतत्पर असल्यामुळें त्यानें औरंगजेब बादशाहाबरोबर पूर्वी मोठमोठ्या लढाया करून जें शौर्य गाजविलें व ज्या उत्तम रीतीनें राज्य केलें तें सर्व गाडें या वेळीं बदलून, तो केवळ स्त्रैण होऊन, व सर्व राज्यकारभार आपला पंचोली दिवाण आणि पुत्र उमरावसिंग यांजवर सोंपवून, आपण आपला कमलादेवी राणीसह 'राजसमुंदा'वरील महालांत शृंगारविलासांमध्येंच चूर होऊन राहिला. बरें, युवराज उमरावसिंग यानें, आपल्या पित्यानें आपल्या जीवमानकाळींच आपल्याकडे सोंपविलेला येवढा कारभार पंचोली प्रधान याच्या संमतानें व त्याचा योग्य प्रकारचा मान राखून चालवावयाचा; परंतु त्याप्रमाणें त्याजकडून न घडतां, उलट तो त्या प्रधानाचा अपमान करण्यास उद्युक्त झाला. एकदां उदेपूर शहरांत (राजधानींत) कोणाचा हत्ती मत्त होऊन फिरूं लागला व त्यामुळें शहरांत जिकडे तिकडे कल्लोळ उसळला. त्यावरून पंचोली प्रधान यानें, त्या हत्तीच्या मालकास बोलावून आणून त्यास चांगली जरब घालून ताकीद दिली, व ती कांहीं गैरवाजवी नव्हतीच. परंतु त्या मनुष्याचा उमरावसिंग यानें पक्ष धरून, त्या कामांत पंचोली प्रधान याचा अपमान होण्यासारखें तो बोलला. त्यावरून त्यालाही वाईट वाटून त्यानें एकदम आपल्या प्रधानकीचा राजीनामा दिला. ही गोष्ट चांगली झाली नाहीं व त्यामुळें राज्यांत अस्वस्थता माजण्याचा संभव होता. ही बातमी 'राजसमुंदा'वरील महालांत कमलावती राणीसह रममाण झालेल्या राणा जयसिंग महाराजांस कळल्यावरून, त्यांची स्वारी ताबड-

ल्ची नीट व्यवस्था लावण्याकरितां तेथून उदेपुरास येण्यासाठीं निघाली. येतांना राणा चितोड शहरावरून उदेपुरास येतो आहे तों, युवराज उमरावसिंग याणें आपल्या पित्याचें स्वागत करण्यास मोठ्या इतमामानें सामोरें जाऊन आपल्या सत्पुत्राला योग्य असा त्याचा सत्कार करावयाचा; तो एकीकडे राहून, तो आपल्या आईच्या भलत्याच मसलतीनें बुंदीस पळून गेला व तेथें आजाकडून वगैरे एकंदर दहा-हजार लोक जमा करून तो उदेपुरास राणा जयसिंग याजवर चालून आला. परंतु राण्याला हा आपसांतील युद्धाचा व रक्तपाताचा प्रसंग न यावा अशी इच्छा असल्यामुळें, त्यानें उमरावाच्या लोकांस तोंड न देतां, तो प्रसंग टाळून अरवली डोंगराच्या पलीकडे गोदवाडास गेला. व तेथून त्यानें गनोरा सरदार आपल्या मुलाचे समजुतीकरितां व त्याची कानउघाडणी करण्यासाठीं पाठविला. वरील गनोरा सरदार हा त्या प्रांतांत चालू असलेल्या मोकासदारांत पहिला व मुख्य होता. राण्यानें, युक्तीनें मुलाची समजूत घालून तंटा मिटविण्याकरितां वर लिहिल्याप्रमाणें योजना केली खरी; तरी, तेवढ्यानें त्याची समजूत न होऊन, व त्यास राण्याच्या एकंदर सरदारांपैकीं तीन चतुर्थांश लोक मिळाल्यामुळें, तो जास्त शेंफारून, त्यानें बापाच्या सांगण्याची पर्वा केली नाहीं. इतकेंच नव्हे; तर, त्यानें एकदम आपल्या हत्यारबंद लोकांसह कुमळमेरावर स्वारी केली. कारण, त्याठिकाणीं राण्याचा सर्व खजिना राखून ठेविला होता. तो खजिना हस्तगत करण्यासाठीं युवराज उमरावसिंग याची मोठी उडी होती. परंतु कुमळमेरावरच्या स्वारींत उमरावाला पूर्णपणें अपयश येऊन, त्याचे हेतु ठिकाणच्या ठिकाणींच राहिले. कारण, त्यास बहुतेक सरदार जरी अनुकूल होते तरी त्यांजकडून त्याला त्या वेळीं मुळींच साह्य न मिळून, जे सरदार त्याचे विचारास व करण्यास अनुकूल नसून, जे आपल्या राण्याशीं इमान राखून त्याचे रक्षणास तत्पर होते त्यांतील, बिजोलीचा बेरीसाल, साळुंब्र्याचा कांडल, गनोरा येथील गोपिनाथ आणि देसोगीचा सोळंखी हे सरदार मनःपूर्वक झटून, त्यांनीं कुमळमेरास जाणारा जिलवाड नांवाचा रस्ता जो रोंखून धरिला, त्यापुढें उमरावास जाऊंच दिलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर उमरावाचा चांगलाच पराभव झाल्यामुळें तो आपल्या बापाचे ह्मणण्यास सर्वांशीं कबूल झाला. तेव्हां सर्व सरदारांनीं मध्यस्थी करून त्या पितापुत्रांची एकलिंगाचे देवालयांत भेट करविण्याचा योग आणिला. आणि त्याप्रमाणें त्या शिवालयांत त्यांच्या परस्पर भेटी होऊन, त्यांचें परस्पर पूर्ववत् ऐक्य झालें व राण्यानें पुत्राला त्याच्या अपराधाची माफी करून, त्याजवर पहिल्याप्रमाणेंच प्रेम ठेविलें. त्यानंतर असें ठरलें कीं, राणा जयसिंगानें आपला राज्यकारभार बघावा व राणा जीवमान असेपर्यंत कुमार उमराव-

सिंग याणें जयसमुद्रावरील महालांत जाऊन रहावें. त्याप्रमाणें पुढें उमराव जयसमुद्रावर जाऊन राहिला. नंतर जयसिंगानें निर्वेधपणें वीस वर्षेपर्यंत आपलें राज्य केलें. तथापि, त्यानें मध्यें जें विशेष कौशल्य दाखवून राज्यकारभाराविषयीं उदासीनता दाखविली, तेव्हांपासून त्याचें वजन आणि त्याची प्रौढता जीं नाहींशीं झालीं तीं पुनः पहिल्याप्रमाणें जमलीं नाहींत. त्यानें राज्यारूढ झाल्यानंतर प्रारंभीं जें आपलें शौर्यवीर्य आणि राज्यकर्तृत्वतत्परता दाखविली तशीच त्याजकडून पुढेंही दाखविण्यांत न आल्यामुळें, अर्थात् त्याचा पूर्वीचा वचक व त्याजविषयींचा लोकांमधील पूर्वीचा आदर हे बरेच कमी झाले, यांत आश्चर्य नाहीं. त्याच्या पुढील स्वस्थतेच्या कारकीर्दीत ह्मणण्यासारखी कांहीं एक गोष्ट झाली नाहीं. जयसिंग याचे कारकीर्दीत, त्यानें, प्रारंभीं मोंगलांशीं तह केला, पुढें कांहीं किरकोळ लढाया केल्या, आणि अतिप्रसिद्ध असें 'जयसमुद्र' सरोवर बांधिलें, यापेक्षां कांहीं एक जास्त केलें नाहीं; व ह्या गोष्टी जर त्याजकडून झाल्या नसत्या तर त्याचेविषयीं लिहिण्यास त्याचे संबंधाच्या इतिहासांत कांहींएक महत्वाची गोष्ट नव्हती.

जयसिंगाचे मागून त्याचा मुलगा उमरावसिंग हा वि० सं० १७५६ ह्मणजे इ० स० १७०० या वर्षी मेवाडचा राणा झाला. उदेपूरच्या राणेवंशांत उमरावसिंग हें नांव धारण करणारा असा हा दुसरा मनुष्य असल्यामुळें यास 'दुसरा उमरावसिंग' असें ह्मटलें आहे. तो आपल्या पूर्वजांप्रमाणेंच शूरवीर आणि चपल व धूर्त वगैरे गुणांनीं युक्त असता तर, पूर्वी जो त्याच्याच नांवाचा कीर्तिमान् उमरावसिंग राणा झाला होता त्याचे प्रमाणेंच, हाही पुढें नांवालौकिकास चढून, त्यानें आपल्या वंशाचें नांव राखिलें असतें. पण त्यानें लहानपणीं आपल्या आईच्या चिथावणीवरून व इतर अदूरदर्शी सरदारांच्या मसलतींवरून, आपल्या बापाचे विरुद्ध ज्या दंग्याधोप्याच्या गोष्टी केल्या होत्या त्यांमुळें, त्याचें जितकें वजन राहून लोकांमध्यें त्याचा जसा मान राहावयास पाहिजे होता, त्याला बराच कमीपणा आला; आणि तेणेंकरून त्याचे वेळीं अनायासें मोंगल बादशाही जी खालावत चालल्यामुळें रजपुतांचा वर्चष्मा सहज व्हावयाचा, तसा वर्चष्मा होण्यास हरकत आल्यासारखी झाली. राजसिंग व जयसिंग यांच्या कारकीर्दीत असें उघड दिसून आलें कीं, राज्यकर्त्या पुरुषाच्या स्वतःच्या वर्तणुकीवर त्याच्या एकंदर राज्यांतील सूक्ष्मासूक्ष्म गोष्टी अवलंबून असतात. राजसिंग राज्य करीत असतां, त्यानें, आपल्या बुद्धिबलानें आणि विलक्षण औदार्यानें शत्रूंपुढें टिकाव धरून, इतर अमानुष अशा दुष्काळादि संकटांतून आपल्या रयतेचा उत्तम रीतीनें सांभाळ केला. तो ज्या नेटानें व करारीनें वागत असे त्याचेंच अनुसरण त्याचे मुलगे व सरदार करीत असत आणि पुढें, जयसिंग हा

राणा झाल्यावर तो आपल्या इच्छेप्रमाणें वेगवेगळ्या वेळीं जसजसा वागला तसतशी त्याच्या राज्याची स्थिति ज्यास्तकमी मानानें चांगली किंवा वाईट झाली. त्याचे कारकीर्दींत एकंदरीनें त्याच्या बापाचे वेळचा लौकिक राहिला नाहीं, व त्यानें आपल्या कर्तव्यापटुत्वानें राजसिंगाच्या वेळीं असलेलें महत्व घालविलें, असें सिद्ध होतें.

राणा उमरावसिंग याचे कारकीर्दीच्या आरंभींच औरंगजेबाच्या मुलांमध्यें कांहीं भांडणें लागलीं. तेव्हां ती संधि साधून राण्यानें आपला फायदा करून घेतला; व मोंगल बादशाहीचा वारस जो शाहअलम, ज्याचें मूळचें नांव सुलतान मुआझिम असें होतें, त्याशीं गुप्तपणें तह करून, त्याचे मदतीकरितां एका सूक्तावत सरदाराचे हाताखालीं आपलें रजपूत सैन्य देऊन पाठविलें. व त्या सैन्यानें सिंधुनदीच्या पलीकडे जाऊन मोठमोठ्या लढाया मारून, मोंगल राजपुत्राला जय मिळवून दिले. या सैन्यांत बावीस नागरबंद सरदार असून त्या प्रत्येकास नौबदीचा मान असे; आणि पंधरा तुऱ्याचे मानकरी असून त्यांना कर्ण्याची तैनात असे.

शाहअलम (मुआझिम) याशीं जो राणा उमरावसिंग यानें तह केल्याचें वर सांगितलें, त्या तहांतील कलमें वगैरे पुढें लिहिल्याप्रमाणें उमरावसिंग यानें शाहअलम यास कळविलीं होतीं:—

"तुह्मीं जीं पुढें लिहिलेलीं सहा कलमें आह्मांकडे लिहून पाठविलीं तीं योग्य, लोकसुखावह आणि आह्माला मान्य अशीं आहेत. त्या कलमांप्रमाणें, ईश्वरीकृपेनें आपण उभयतांनींही न चुकतां, त्या गोष्टी पूर्णपणें अमलांत आणिल्या पाहिजेत.

१ लें.—शाहजहान बादशाहाचे वेळेस चितोडच्या गादीची जी व्यवस्था होती तशीच पुढें चालवावी;

२ रें.—गोवध बंद करावा[1];

---

१. रजपुतांच्या प्रत्येक तहात हें गोवधप्रतिबंधक कलम आपले असावयाचेंच, व याबद्दलची, खुद्द हा मूळग्रंथ लिहिणाऱ्या कर्नल टॉड् साहेबानेही मोठी तारीफ केली आहे. तो ह्मणतो, मीं जे कांहीं तहनामे बघितले त्या सर्वांमध्यें गोवधप्रतिबंधाचें कलम नाही, असें आढळलेंच नाहीं. व कोणत्याही परदेशीय वकिलाशीं त्यांचे सख्यसंबंधाचे करारमदार झाले तरी रजपूतराजांचें त्यामध्यें गोवधप्रतिबंधाचें बोलणें आपलें असावयाचेंच. इंग्रजसरकाराशीं इ० स० १८१७–१८ मध्यें जे तहनामे झाले आहेत त्यांमध्येंही, 'प्रत्येकानें आपआपल्या हद्दींतील गोवधप्रतिबंध खुशाल पाळावा,' असें कलम आहेच. इंग्रजी फौजेच्या स्थितीरीतीवरून खुद्द इंग्रजांच्या अमलांत गोवधप्रतिबंध कशा रीतीनें असेल याविषयीं बोलणें नकोच; परंतु रजपूतसंस्थानांत एकंदर गोवधप्रतिबंध सक्तीनें अमलांत येत आहे. सर्व राजस्तानांत–मेवाड, मारवाडप्रांतांत–कोणत्याही रीतीनें गोवध होऊं न देण्याविषयीं त्यांचा जबरदस्त कट आहे. व तो कट त्या जनावरांच्या उपयोगाचे दृष्टीनें कोणत्याही रीतीनें गाफील ह्मणतां येत नाहीं. अशा प्रकारचे एकेका देशांत व धर्मांत एकेका प्राणिवधाचे प्रतिबंध अ-

३ रें.—शाहजहान बादशाहाचे मागें जे महाल जप्त झाले ते सोडून परत द्यावे;

४ थें.—स्वर्लोकवासी अकबर बादशाहाचे कारकीर्दीत ज्या धर्मसंबंधी मोकळिकी असत त्या तशाच ठेवाव्या;

५ वें.—ज्यांस आपल्याकडून बर्तर्फी मिळेल त्यांस आह्मांकडे व आमच्याकडून बर्तर्फी मिळालेल्यांस तुह्मांकडे आश्रय मिळूं नये; आणि,

६ वें.—दक्षिणेंत जें आमचें सैन्य आहे त्यास तिकडे कोणत्याही प्रकारची हरकत नसावी, व तें मोडण्याचेंही कारण नाहीं[1]

---

सतात. मुसलमानांमध्यें डुकरें मारण्याचा प्रतिबंध आहे. इजिप्ट देशांतही असाच एक प्रतिबंध आहे. व हे सर्व प्रतिबंध त्या त्या देशांत कोणाही जाणारानें पाळावे, हा उत्तम पक्ष आहे. कारण, ते प्रतिबंध पाळल्यापासून कोणाचाही मोठासा तोटा होत नाहीं व ज्या स्नेहधर्माच्या उद्देशानें भिन्न धर्माचे लोक एकमेकांशीं सख्यसंबंध ठेवतात त्या उद्देशाची सिद्धि होण्यालाही त्या प्राणिवधप्रतिबंधाला अनुकूल रीतीनें वागणें ही शहाणपणाची गोष्ट आहे. ही गोष्ट मोंगल बादशाह समजत होते, व औरंगजेब बादशाहालाही ती गोष्ट समजत नव्हती असें नाहीं. परंतु त्याचे धर्मखूळ फारच विलक्षण असल्यामुळें, त्याजकडून जें रजपूत लोकांशीं आचरण झालें तें अगदीं वेडेपणाचें झालें. प्राचीनकाळच्या जुन्या इतिहासाकडे वळून बघितलें तरी आपल्याला असें आढळून येईल कीं, संसारांत उपयोगी पडणाऱ्या गाईसारख्या पाळीव जनावरांचा संहार करण्याचें बहुत राष्ट्रांतून वर्ज केलें असे. हिंदु लोकांच्या प्रसिद्ध धर्मशास्त्रवेत्त्या मनु वगैरे स्मृतिकारांनीं गोवध सर्वांशीं वर्ज धरिला आहे. व मनूचें अथवा अहिंसाधर्माचा उपदेश करणारा जो प्रसिद्ध बुद्धाचार्य किंवा जैन याच्या मताचेंच अनुसरण, स्पार्टा ( ग्रीस ) येथील प्रसिद्ध कायदे करणारा जो ट्रिप्टोलेमस यानेंही करून आपल्या कायद्यांत त्या देशांत त्या वेळीं चालू असलेले वृषमेध (बैलाचे बळी व यज्ञ) बंद ठेवण्याविषयीं लिहिलें आहे. इतकेंच नव्हे; तर कोणत्याही जीवमान प्राण्याचा वध करूं नये असेंही त्यानें लिहिलें आहे.

१. वर जो दक्षिणेंतील सैन्याचा संबंध आला आहे तें सैन्य शाहअलमचा भाऊ सुलतान अजीम याचे साह्यार्थ दक्षिणेकडे ठेविले होतें. ह्या साह्याबद्दल सुलतान अजीम याजकडून उमरावसिंगाला एक पत्र गेलेलें चितोडच्या जुन्या दप्तरांत सांपडलें आहे. त्यांत अजीमानें असें लिहिलें आहे:—"राणा उमरावसिंग यांस कळावें कीं, आपले पत्र पावलें, आणि आपल्या मातोश्रीचें वर्तमान ऐकून मला फार दुःख झालें; परंतु ईश्वराच्या फैसल्यावर वाद मुळींच नाहीं. माझे कल्याणाकडे लक्ष्य असूं द्या. राजा रायसिंगानें आपलेविषयीं मला सांगितलें. आपण माझे आहांत. मी आपल्यावर पूर्ण विश्वसून आहें व आपली आज्ञाधारकता जी मी आजपर्यंत मानीत आलों तीच पुढें चालविणें आहे. आपल्या शौर्यशाली पूर्वजांनीं जो मुलूख काबीज केला तो सर्व आपलाच आहे;—परंतु आपल्या कर्तव्यास जागण्याची हीच वेळ आहे. बाकी विशेष मजकूर आपल्या नौकरमाणसांकडून कळेल. माझेविषयीं आपल्यास स्मरण असूं द्या. आपल्या रजपूत सैन्यानें फार उत्तम शौर्य दाखवून कीर्ति मिळविली."

या काळच्या विशेष गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. कारण, ही वेळ ह्मणजे मोंगल बादशाहीचा उतरता काळ असून, इंग्रज सरकारचा या इतक्या दूरच्या देशांत शिरकाव होऊन राज्याधिकाराचा पाया पडण्यास येथूनच सुरुवात झाली. ह्या काळाकडे लक्ष्य दिलें ह्मणजे राज्यक्रांतीला कसकसे योगायोग घडून यावे लागतात हें स्पष्ट समजतें. औरंगजेबानें हिंदुप्रजेशीं, त्यांत विशेषेंकरून रजपूत लोकांशीं द्वेष केला व त्यांचीं मनें बिघडविलीं. त्यानें आपल्या शहाणपणाच्या जोरावर आपल्या बादशाहीचा कारभार आपल्या उमेदींत तसाच रेटीत नेला खरा; परंतु ती त्याची उमेद वयोमानानें कमी कमी होत जाऊन, त्याचा येवढा राज्याचा गाडा शेवटीं शेवटीं अगदींच खचला. जें कांहीं अकबरानें मिळविलें तें सर्व तो गमावून बसला. याचें कारण बघितलें असतां केवळ रयतेची अप्रीति. जर रयत प्रतिकूल झाली तर केवढेंही शहाणपण असो, केवढीही दौलत असो, कितीही फौज असो, राज्याचा पाया कसाही बळकट व खंबीर असो, भोंवतालचे राजे कितीही अनुकूल असोत व त्यामुळें वेळेवर फौजफांटा आणविण्याच्या कशाही सोई व सामर्थ्य असो, आणि पदरच्या व अनुकूल असलेल्या लोकांस मोठमोठे मानसन्मान, इनामें, बक्षिसें, किताब वगैरे देण्यानें संतुष्ट करण्याची कितीही शक्ति असो; पण रयत एकदां फिरली कीं, मग त्या सर्व अनुकूल व उमेदीच्या गोष्टी ठिकाणच्या ठिकाणींच राहून, त्यांचा कांहींएक उपयोग होत नाहीं. हें औरंगजेबाच्या कारकीर्दीवरून अगदीं स्पष्ट दिसतें. आणि हें उदाहरण कोणत्याही काळच्या व कोणत्याही ठिकाणच्या राज्यभारवाहकांनीं लक्ष्यांत धरण्यासारखें आहे. आज इंग्रज सरकारच्या ताब्यांत जितका मुलूख आहे इतका, किंबहुना यापेक्षां जास्त मुलूख औरंगजेबाचे ताब्यांत असून, त्याला आपल्या मुलखांत स्वस्थता आणि आपला वचक ठेवण्यास इंग्रज सरकारापेक्षां पुष्कळ गोष्टी अत्यंत अनुकूल होत्या. परंतु त्या अनुकूल गोष्टींपासून त्यानें आपला व आपले राज्याचा कांहींएक फायदा करून घेतला नाहीं. त्याचे वंशाचा आणि रजपुतांचा शरीरसंबंध झालेला असल्यामुळें त्याचेविषयींचा रजपुतांस विशेष अभिमान आणि कड असणें हें साहजिकच होतें. त्याला आपल्या मुलखांतून वाटेल तिकडून रजपूत राजांच्या मदतीनें डोंगरी भील, कोळी वगैरे एकनिष्ठ लोक वाटतील तितके जमा करून त्यांजकडून शौर्य गाजवून आपलें राज्य वाढविण्यास किंवा तें विशेष पक्कें करण्यास योग्य मदत झाली असती. त्याचेमध्यें आपल्याला साह्यकर्त्या लोकांस चांगलीं इनामें व बक्षिसें देऊन त्यांस खुष ठेवण्याचें सामर्थ्य नव्हतें असें नाहीं. असा सर्व अनुकूलतेचा भाग असतां त्याचा त्याला योग्य रीतीनें उपयोग करून घेतां आला नाहीं, इतकेंच नाहीं; तर उलट त्यानें त्या अनुकूल व साभिमान असणाऱ्या लोकांचा अप-

मान व छल आरंभून, घरांतल्या घरांतच आपल्या नाशार्थ शत्रु उत्पन्न करून ठेवले. त्यांच्यावर जेजिया कर लादून मोठा जुलूम चालविला. हा कर लादण्यांत त्याच्या शहाणपणाचा कांहींएक भाग नसून, केवळ दुरभिमान आणि धर्मखूळ मात्र त्यानें माजवून, आपला व आपले वंशजांचा सर्वथैव नाश करून घेतला. येवढी मोठी राज्यसत्ता हातीं असून व कोणत्याही गोष्टीची प्रतिकूलता नसून, ज्यानें आपल्या मूर्खपणानें त्या सत्तेचा विध्वंस करून घेतला, त्या राजसत्ताधाऱ्याला काय ह्मणावें, हें समजत नाहीं. त्याला आपल्या शहाणपणाचा मोठा अभिमान असे; आणि त्या अभिमानांतच त्यानें आपल्या विस्तृत राज्याचा नायनाट करून टाकला ! त्याचा आपला येथून तेथून सर्वत्र मुसलमानी धर्म प्रसृत करण्याचा मोठा दुरभिमान होता. पण असले वेडेपणाचे भलतेच अभिमान कोठें सिद्धीस गेले आहेत काय ?

ह्या जुलमी औरंगजेब बादशाहाची मेहरबानी, ज्यांजकडून आपला धर्म टाकून त्याच्या धर्माचा स्वीकार करण्यांत येई त्यांजवरच काय ती होत असे. आणि अशा योगानेंच एकंदर रजपुतांचें व त्याचें जे हाडवैर माजलें तें त्यांच्या अंतापर्यंत सारखें होतें. मेवाडच्या संबंधानें अशा प्रकारचें एक उदाहरण येथें घेण्यासारखें आहे. चंबळ नदीचे कांठीं रामपुरा ह्मणून एक संस्थान असून, तेथें राव गोपाळ या नांवाचा संस्थानिक असे. हा राव गोपाळ सिसोदिया वंशाच्याच एका शाखेपैकीं होता. राव गोपाळाचें दक्षिणेकडे एक पथक होतें. त्या पथकावर तो असे, व संस्थानांत त्याचा मुलगा कारभार बघत असे. परंतु त्या मुलानें संस्थानचा जो वसूल येई तो बापाकडे खर्चावयास वगैरे न पाठवितां व त्याचा त्याला हिशेबही न देतां, तो सर्व वसूल तो आपलेच खर्चाकडे लावूं लागला. तेव्हां ह्याबद्दलची मुलावरील तक्रार राव गोपाळ यानें, बादशाह औरंगजेब याजकडे नेली. औरंगजेब हा एकामागून एक संस्थानें तोंडांत टाकायला बसलाच होता, हें राव गोपाळाच्या मुलास माहित होतेंच. व बापाच्या तक्रारीनें व फिर्यादीनें तर बादशाह आपल्यावर अन्यायारोप करीलच; तेव्हां यांतून सुटून बादशाहाच्या मेहरबानीस पात्र होण्याला व आपलें संस्थान आपलेकडे राखून घेण्याला धर्मांतर करून, बादशाहाचे हेतूप्रमाणें आपण मुसलमान व्हावें हें बरें; ह्मणजे, बादशाहाचा राग शांत होऊन आपलेंही कल्याण होईल, असा त्यानें विचार केला. व त्या विचाराप्रमाणें त्यानें अखेरीस धर्मांतर करून मुसलमानी धर्माचा स्वीकार केला. तेव्हां अर्थात् बादशाहानें राव गोपाळाचे तक्रारीकडे व अर्जीकडे मुळींच लक्ष्य न देतां, उलट त्याचे बाट्या पुत्राकडेच त्याचा अभिमान विशेष असल्याचें तो दाखवूं लागला. हें राव गोपाळास सहन न होऊन, त्यानें एक दोन वेळां रामपुरावर स्वारी करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत त्याला यश मिळालें नाहीं. मग तो

राणा उमरावसिंग याजकडे गेला. तेव्हां अर्थात् राण्याकडून राव गोपाळ यास पाठबळ मिळून तो पुनः दंगाफिसात करील अशी औरंगजेबास काळजी पडून, त्यानें आपला मुलगा अजीम यास, माळव्याकडे जाऊन तेथें राणा व राव गोपाळ यांच्या हालचालीवर लक्ष ठेवून बंदोबस्तानें राहण्याविषयीं हुकूम पाठविला. राव गोपाळ हा पहिल्यापासून औरंगजेबाच्या पक्षाचा असून, तो मोठा शूर होता; व त्यानें बादशाहीच्या रक्षणाकरितां पूर्वी अनेक प्रसंगीं उत्तम प्रकारेंकरून आपलें वीर्य प्रदर्शित केलें होतें. हा उपकार औरंगजेबानें स्मरावयाचा होता. परंतु, जो केवळ धर्मखुळा होऊन, ज्याला धर्माच्या प्रसाराशिवाय दुसरें कांहींएक करण्याची इच्छा नव्हती, तो आपल्या अभिमानी परधर्मी मित्रांचा उपकार जाणील व त्यांच्याच हिताकडे लक्ष्य देईल अशी गोष्ट कधींही व्हावयाची नव्हती, आणि त्याप्रमाणें नाहींच झाली. याप्रमाणें राव गोपाळ बेदाद झाला व राण्याच्या संबंधानेंही औरंगजेब कपट आणि गैरविश्वास दाखवूं लागला, तेव्हां राण्यानें खरोखरीच स्वारीची तयारी केली. राण्याची तयारी झाली तसे माळव्यांतलेही लोक त्यास मिळून, त्या स्वारीचें रूप बादशाहाला बरेंच मोठें दिसूं लागलें. इतक्यांत दक्षिणेकडे मराठे प्रबल होऊन त्यांनीं जी पुढें चाल केली ती नर्मदा उतरून, ते उत्तरहिंदुस्थानांत शिरले. मराठ्यांचा मुख्य सरदार नेमाजी शिंदा हा होता. त्यानें आपल्या लोकांकडून जिकडे तिकडे दंगे चालविले. तेव्हां औरंगजेबाला आपला एक जयसिंग नांवाचा सरदार अजीमाचे मदतीकरितां म्हणून माळव्यामध्यें पाठविणें भाग झालें. ह्या सर्व धामधुमींत मराठ्यांनीं एकसारखा जय आणि लौकिकच मिळविला. रजपुतांना आजपर्यंत मोंगलांशीं लढून लढून आणि स्वाऱ्या करून करून त्या गोष्टीचा वीट आणि तिरस्कार आला होता; व म्हणून त्यांनीं पुढें औरंगजेबाशीं लढाया करण्याचा नाद बहुतकरून सोडूनच दिला. शिवाय, त्यांनीं असें बघितलें कीं, हिंदुधर्माभिमानी असे कोणते तरी लोक त्यांचा समाचार घेण्यास सिद्ध आहेतच; तेव्हां त्यांजकडेसच तें काम सोंपवून आपण कांहीं दिवस विश्रांति घ्यावी हें बरें. आणि असा विचार करून, त्यांनीं वेगळी धामधूम चालविण्याचें बंद केलें. तथापि, मराठ्यांनीं मोंगलांचा पुरा पिच्छा घेतला, व त्यांतच औरंगजेबाच्या कुटुंबांत बादशाहीच्या संबंधानें तंटे लागून, एकंदर सर्व बादशाहीमध्यें बलबलपुरी आणि अव्यवस्था माजली. अशा रीतीनें औरंगजेबाच्या डोळ्यांदेखतांच त्याच्या राज्याची ही दुर्दशा त्याला पाहण्याचा प्रसंग येऊन, व तशा दुःखद स्थितींतच काळजी व चिंता वाहून, तो मोठ्या कष्टानें, जिल्काद चंद्र २८, इ० स० १७०७ रोजीं, दक्षिणेमध्यें त्याच्याच नांवाच्या औरंगाबाद शहरीं मृत्यु पावला.

औरंगजेब मृत्यु पावल्यानंतर त्याचा मुलगा सुलतान अजीम हा दत्तियाचा राजा

राव दलपत बुंदेला व कोट्याचा राजा राव रामसिंग हाडा यांच्या साह्यानें गादीवर बसला. दत्तिया व कोटा येथील राजे सुलतान अजीम याचे प्रांतांतच त्याचे सरदार ह्मणून बहुत दिवस त्याची नौकरी पतकरून होते. सुलतान अजीम यानें बापाचे मागें आपल्याला बादशाह ह्मणवून, तो आपली बादशाही सर्व लोकांना समजावी व त्यांनीं ती मानावी ह्मणून तो बादशाहाची राजधानी जी आग्रा तेथें जाण्याकरितां निघाला. तों काबुलाकडून त्याचा वडील भाऊ सुलतान मुआझिम हाही बापाची मृत्युवार्ता ऐकून तावडतोब निघाला होताच. मुआझिम याचे साह्याला तर मेवाड व मारवाड या देशांतील व त्याचप्रमाणें पश्चिम राजपुतान्यांतील बहुतेक राजे असून, त्याचा पक्ष विशेष दृढ दिसत होता. त्या दोघां भावांची जाजव नांवाच्या ठिकाणीं गांठ पडून, दोघांचेंही तुमुल युद्ध झालें. त्यांत अजीम याचा मुलगा बेदरबख्त आणि दत्तिया व कोटा येथील राजे असे मारले गेले; आणि अजीमाचा पूर्णपणें पराभव होऊन, त्याचा पक्ष सर्वांशीं शिथिल पडला. तेव्हां अर्थात् सुलतान मुआझिम हा आग्र्याच्या गादीवर बसला. त्या वेळीं त्यानें आपल्याला शाहअलम असें नांव घेतलें. ह्याप्रमाणें शाहअलम बादशाहाची कारकीर्द सुरू झाली. शाहअलम हा रजपुतानीचा मुलगा असल्यामुळें त्याचेविषयीं रजपुतांस अभिमान असून, त्याचेंही रजपुतांकडे विशेष लक्ष्य होतें. त्याचप्रमाणें, त्याजमध्यें इतर पुष्कळ चांगले गुण असल्यामुळें तो सर्वांना आवडता असा बादशाह झाला. शाहजहान बादशाहाचे मागून औरंगजेब जो बादशाह झाला व त्यानें आपल्या अर्धशतकाच्या कारकीर्दींत जी मनस्वीपणानें आणि सर्वांना अप्रिय अशी कारकीर्द केली, तसें न होतां, त्या वेळीं शाहअलम हाच तख्तावर बसला असता तर तैमूरवंशाची दिल्लीची बादशाही अगदीं खंबीर पायावर बसून, एशियाखंडांत ती बादशाही ह्मणजे एक मोठें वजनदार आणि शक्तिमान् राष्ट्र झालें असतें. परंतु तशी गोष्ट घडावी असा ईश्वरी संकेत नव्हता. औरंगजेबाच्या अतिदुष्ट स्वभावानें त्यानें रजपुतांस ज्या रीतीनें वागविलें त्यामुळें त्यांच्या मनावर अशी असाध्य जखम झाली कीं, ती, पुढें कोणत्याही मोंगल बादशाहाच्या चांगल्या राज्यकर्तृत्वाच्या मलमानें भरून येण्यासारखी नव्हती; व ती कधींच भरून आली नाहीं, यांत आश्चर्य नाहींच. रजपुतांचा हा पूर्ण ग्रह होऊन गेला कीं, या मुसलमानांशीं आपण कितीही इमान ठेविलें तरी, प्रसंगीं ते विश्वासघातानें आपले गळे कापून स्वतःचा फायदा करून घेण्यास कधींही सोडावयाचे नाहींत; इतके ते अनीतिमान्, अधमाधम आणि नीच वृत्तीचे आहेत. ' तेव्हां, त्यांस भरभराट व उन्नति येऊं देण्यापेक्षां, त्यांना जिकडून अधःपात मिळेल तिकडून प्रयत्न करणें हेंच आतां आपलें कर्तव्यकर्म आहे, असें सम-

जून त्याप्रमाणें ते त्यांच्याशीं वागत होते. त्यांना असें पकें समजून चुकलें कीं, हीं विषवृक्षाचीं कडू फळें अमृताप्रमाणें सुखकर आणि मधुर कोठून उत्पन्न होणार ? तेव्हां, त्यांनीं, आपली प्रजाधर्मदर्शक जी राजनिष्ठा ती एका बाजूस झुगारून देऊन, अगदीं उघडपणें, जशास तसें ह्याप्रमाणें, वागण्यास सुरुवात केली. अमुक रीतीनें या बादशाहांशीं वागलें ह्मणजे आपल्याला त्यांजकडून सुखस्वास्थ्य मिळेल अशी एकही गोष्ट असल्याची त्यांना खात्री व विश्वास वाटेना; आणि यासाठीं सर्व रजपूत एक विचार करून मोंगल बादशाहीचें निर्मूलन करण्यास उद्युक्त झाले. यांत त्यांच्याकडेही दोष देतां येत नाहीं.

शाहअलम बादशाह तख्तनशीद झाल्यावर त्याला लौकरच आपल्याला रजपुतांचें जें यत्किंचित् साह्य होतें तें किती अंशांनीं कायमचें व खात्रीचें आहे हें बघण्याचा प्रसंग आला. तो गादीवर बसल्यानंतर पाहतो तों त्याचा धाकटा भाऊ कामबक्ष यानें दक्षिणेंत आपण बादशाह असल्याबद्दल प्रसिद्ध केलें. तेव्हां शाहअलम यानें त्याजबद्दलचा बंदोबस्त केला. इतक्यांत उत्तरेकडे पंजाबांत शिखलोकांनीं उठावणी करून पुंडावीं मांडलीं. शिखलोक नानकपंथानुयायी असून, ते जितलोकांचे वंशज होते. त्यांनीं इ० स० चे पंधरावे शतकांत सिंधुनदीचे पांच फांट्यांचे दुबेळक्याच्या प्रदेशांत वसाहत केली. त्या प्रदेशास पंजाब असें ह्मणतात. त्यांनीं पंजाबांत वसति केल्यावर सुमारें एक शतकानें, ज्याप्रमाणें ते हिंदुधर्मांतील कित्येक अडचणींतून मुक्त झाले तसेच, मोंगलबादशाहाचे अमलांतूनही मुक्त होऊन, विशेष स्वातंत्र्यानें राहण्याची त्यांनीं खटपट चालविली. याच वेळीं (इ० स० १७०९-१०) अंमेरचा व मारवाडचा असे दोघे राजे बादशाहाला भेटण्याकरितां गेले होते. परंतु रीतीप्रमाणें बादशाहाला भेटल्यावर त्याला विचारून परत जाण्याकरितां निघावयाचें, तसें त्यांनीं केलें नाहीं. तर, उलट त्यांनीं त्याचेविरुद्ध कांहीं कट करून आपलें स्वातंत्र्य मिळविण्याची खटपट चालविली. अशा प्रकारें त्यांच्या वर्तनांत भेद पडलेला पाहून, बादशाहानें आपल्या शाहजाद्यास त्यांचेकडे त्यांना बोलावून आणण्यास पाठविलें. तेव्हां त्यांनीं बादशाहाला खाजगी रीतीनें व साधेपणानें भेटावयास जायचें तसें न जातां, ते आपले स्वारशिबंदी व लष्कर घेऊन बादशाहाकडे गेले. त्यावरून त्यालाही मोठी धास्ती पडून, त्यानें, त्यांच्या भेटींत त्यांनीं जें जें कांहीं मागितलें तें तें सर्व त्यांस देऊन, त्यांना खुष केलें. ह्याप्रमाणें विलक्षण रीतीनें आणि कांहीं एक गडबडसडबड न होतां वरील दोघां रजपूतराजांस आपलें स्वातंत्र्य कमवतां आलें. त्यानंतर ते दोघेही राजे बादशाहापासून निघून पुढें उदेपुरास राणा उमरावसिंग याजकडे गेले व तेथें त्या तिघांची एक मस-

लत होऊन, त्या त्रिमूर्तींचा परस्पर एक तहनामा ठरला. मागें ज्याप्रमाणें हे तिघेही एक वेळ एकविचारानें आपल्या लोकांचे मुख्य व पुढारी होते, त्याप्रमाणेंच त्यांचें या वेळीं पुनः एकीकरण झालें. व त्यांनीं आपलें हें एकीकरण परस्पर बेटीव्यवहारानें विशेष दृढ केलें. कारण, अकबर व प्रतापसिंग राणा यांचे कारकीर्दीपासून, ह्या परस्पर तीन राजकुटुंबांत, आपल्या कुलाचें पावित्र्य व अव्यभिचार कायम राखण्याकरितां, बेटीव्यवहार होण्याचें अगदींच बंद होतें. तो निषेधात्मक नियम या वेळीं मोडून, तिघांनींही अंतर्बाह्य रीतीनें आपली एकवाक्यता केली; व ह्या वेळेपासून मोंगल बादशाहाशीं राजकीय किंवा घरगुती असा कोणताही संबंध न ठेवण्याविषयींच्या त्यांनीं शपथा घेतल्या. ह्या राजत्रयांचे बेटीव्यवहाराचे ठरावांत त्यांनीं असेंही ठरवून टाकलें कीं, आतां ह्यापुढें आपल्या ह्या वैवाहिकी संयोगापासून जी पुरुषसंतति होईल त्या संततीचाच आपल्या आपल्या राज्यावर वारसा समजला जावा; व स्त्रीसंतति झाली तर परस्परांचे कुटुंबांत त्यांचे लग्नव्यवहार अखंड चालू राहून, अमक्याला मोंगलांचा पदर लागल्यामुळें अमक्या राजकुटुंबांतल्या मुलीची जातकुळी कमी आहे, असें समजलें जाऊं नये.

परंतु ही जी त्या राजत्रयांची एकी झाली हिचा परिणाम पुढें चांगला झाला नाहीं. कारण, राज्याधिकारत्व ज्येष्ठपणावर जें आजपर्यंत चालत आलें होतें तें ह्याप्रमाणें बंद पडल्यासारखें होऊन, त्या परस्पर कुटुंबांतील मुलींपासून होणाऱ्या संततीकडेच काय तो राज्याधिकार जाण्याचें ठरलें; ह्यामुळें त्या तिघांही राजकुटुंबांत कलहप्रवेश होऊन, त्यांनीं, आपल्यावरील मोंगल बादशाहाचा वरिष्ठपणा काढून स्वातंत्र्य मिळविण्याकरितां जी येवढी खटपट केली त्या खटपटीचे उलट, शेवटीं ह्या कुटुंबकलहामुळें त्यांचेमध्यें मराठे शिरून पुढें, तेच त्यांना वरचढ झाले व त्यांनीं त्या कुटुंबकलहाचा आपल्याला मात्र फायदा करून घेतला असें आढळून येईल.

रामपुरा येथील राजा स्वधर्म टाकून मुसलमान बनला होता व त्या अभिमानानें शाहअलम बादशाहानें त्यास त्या राज्यावरील रजपूत वारस जो हिम्मतसिंग त्याशीं झुंजण्यास मदत केली हें बरोबर झालें नाहीं. बादशाहानें तसें करावयाचें नव्हतें. बादशाहाचें तसें अभिमानाचें कृत्य पाहिल्यावर मग राणा उमरावसिंग यानेंही हिम्मतसिंगाचा पक्ष घेऊन, रामपुऱ्यावर स्वारी केली. परंतु त्या स्वारींत हिम्मतसिंगाला यश मिळालें नाहीं. कारण त्या बाट्या राजाचा मुलगा रत्नसिंग (आतां राजा मुस्लीमखान) यानें आपल्या राज्यावर आलेल्या ह्या स्वारीचा पराभव करून, बादशाहाकडून मोठी वाहवा व बक्षीस मिळविलें. परंतु ह्या पराभवाचें कारण असें झालें ह्मणून सांगतात कीं, हिम्मतसिंगाला साह्यार्थ ह्मणून जो राठोड रायसिंग सरदार

दिला होता त्याचा बाप सरदार सावळदास हा त्याच वेळीं पुरमांडेल येथील सुभेदारें फिरोजखान याजवर स्वारी करण्यास गेला होता; परंतु तिकडे त्याचा पराभव झाल्यामुळें तो अजमीरास परत आला व तेथें पुढें लौकरच मेला. हा सरदार जयमल्लाचा वंशज असून, मोठा राजनिष्ठ होता. त्याचा ह्याप्रमाणें परिणाम झालेला पाहून, राण्यानें वर सांगितलेल्या, हिम्मतसिंगासै साह्य करण्यास पाठविलेल्या त्याच्या रायसिंग पुत्रास लिहून पाठविलें कीं, 'तूं हातीं घेतलेलें काम सोडून इकडे निघून ये. जाऊं दे तो मुलूख गेला तरी.'

येथें शूर दुर्गादासाचा पुन: संबंध येतो. औरंगजेबाचा बंडखोर मुलगा अकबर यास ज्यानें आपल्या आश्रयास ठेवून त्याचें संरक्षण केलें होतें, (पृष्ठ २४० व पायथ्याची टीप पहा) तो दुर्गादास अनाश्रित होऊन, उदेपुरास आपल्या फौजेसह येऊन राहिला होता. तेथें राण्याकडून त्यास पांचशें रुपये रोजप्रमाणें खर्चावयास मिळत असत; व तेवढ्यांत तो खुष असे. इतक्यांत शाहअलम बादशाह इ० स० १७१२ मध्यें विषप्रयोगानें मारला गेला. हा शाहअलम बादशाह औरंगजेबापासून जी बादशाहीमध्यें बजबजपुरी झाली होती ती मोडण्यासारखा होता; व आणखी कांहीं दिवस वांचला असता तर त्यानें मोंगलकारकीर्दीचें वैभव पुन: स्थापन केलें असतें. परतु त्याचे आयुष्य थोडें झालें, यास नाइलाज झाला ! तो मोठा बुद्धिमान्, सारासारविचारी, अनुभविक आणि मनमिळाऊ असल्यामुळें बादशाहींतील कोणतेंही कार्य सिद्धीस नेणें त्याला अशक्य नव्हतें. परंतु त्याचेपुढें जे बादशाह दिल्लीच्या तख्तावर आले ते अगदीं नादान व मूर्ख होते. त्यांच्यामध्यें कर्तृत्व ह्मणून बिलकुल नसून, ते केवळ बादशाहाचे वंशज ह्मणूनच गादीवर आले होते. बाकी, त्यांजमध्यें पराक्रम ह्मणून कांही नव्हता. त्यांचे वेळीं, दिल्लीच्या दरबारांत, हुसेन अल्ली व अब्दुल्लाखान अशा दोघां सय्यद भावांचें वजन फार वाढत चाललें असून, त्यांनीं बादशाह ह्मणजे एक कळसूत्री बाहुलें करून ठेविलें होतें. हे सय्यदबंधु पंजाबांतील अंतर्वेदी या भागांतून दिल्लीदरबारांत आले होते. त्यांनीं शेवटीं शेवटीं असें चालविलें कीं, त्यांच्या मनांत असेल त्याला आज तख्तावर बसवावें आणि उद्यां पुन:

---

१. ह्या संबंधानें पुढील पत्र, हा मूळग्रंथलेखक कर्नल टॉड् यास उदेपूरच्या दप्तरांत मिळालें:— "महाराणा उमरावसिंग यांजकडून सावळदासपुत्र रायसिंग राठोड यास—तुझे भोंवतालचा मुलूख व तुझीं गावें वगैरे सोडून इकडे निघून ये. तुला व तुझ्या कुटुंबास राहण्याची व निर्वाहाची मी इकडे सर्व तजवीज करतों. विशेष कांहीं विचार कर्तव्य असेल तर दौलतसिंग चोंडावत याची मसलत घे. ह्या पत्राप्रमाणें तावडतोब कर. मित्ती पौष मास संवत् १७६४ (डिसेंबर, इ० स० १७०८-९)."

काढून तिसऱ्यासच बसवावें, असा स्वेच्छ क्रम ठेविला होता. आह्मी आतां ज्या वेळचा इतिहास लिहितों आहों त्या वेळीं वरील दोघां भावांनीं दिल्लीच्या तख्तावर फिरोखशीर नांवाचा मनुष्य बादशाह केला होता. ही वेळ उत्तम आहे असें जाणून, वरील रजपूतराजत्रयानें आपल्या कामास सुरुवात केली.

रजपुतांनीं ही संधि अनुकूल आहे असें पाहून आपला मुसलमानांवरील सूड उगविण्यास आणि आपल्या धर्माच्या संबंधानें मुसलमानांनीं जी पायमल्ली केली होती तिजबद्दलचें उट्टें काढण्यास सुरुवात केली. मुसलमानांनीं हिंदुलोकांच्या यज्ञभूमि आणि वेदी मोडून टाकून, त्यांजवर मशिदी बांधल्या होत्या; आणि हिंदूंच्या धर्माचार्यांचा व इतर हिंदु अधिकाऱ्यांचा ते फार छल व अपमान करीत असत. मुसलमानांनीं आपलें वजन चोहोंकडे इतकें बसवलें होतें कीं, राजस्थानांतील प्रत्येक शहरीं त्यांचे मुल्ला व काजी हे आपले नियमित कामदार होतेच; परंतु त्या सर्वांचें रजपुतांनीं एकनिश्चयानें उच्चाटन चालविलें. त्यांनीं मुसलमानांच्या मशिदी उत्तरून टाकिल्या आणि मुल्ला व काजी यांस हुसकून लाविलें. मुसलमानांस हुसकून लावण्यांत मोठे अभिमानी आणि दृढ निश्चयाचे असे राठोड हे पहिल्यापासून प्रसिद्ध होतेच. मारवाडचा राजा जसवंतसिंग वारल्यावर राठोड स्वस्थ बसले नव्हतेच; व पुढें जसवंतसिंगाचा मुलगा अजितसिंग यानें तर मारवाडांतून मोंगलांचा अगदींच बींमोड करून टाकला.

या वेळीं वर लिहिलेलें, जयपूर, जोधपूर व उदेपूर येथील राजत्रय सांबर तलावाचे कांठीं आपल्या सैन्यांनिशीं एकत्र झालें.[१] ह्या तिन्ही राजांनीं सांबर तलाव ही आपली हद्द ठरवून, त्या तलावांतल्या मिठाचें उत्पन्न तिघांनीं वांटून घेतलें. त्या प्रांतांत बहुतेक मीठ ह्या खाऱ्या तलावांतलेंच खपतें.

रजपुतांनीं दिवसेंदिवस जसजसा मोंगलांचा अधिकार झुगारून आपला वर्चष्मा वाढविण्याची सुरुवात केली तसतसा दिल्लीच्या दरबारांत त्यांना हरकत कशी करावी

---

१. मुल्ला व काजी हे मुसलमानांचे दोन अधिकारी त्यांच्या वस्तीमध्यें असावयाचेच. मुल्ला नांवाच्या अधिकाऱ्यांनीं जनावरें मारावयाचीं; व काजींनीं लग्नमुहूर्त लावणें किंवा लग्नमुहूर्त तोडणें, सणवार वगैरेंचे शास्त्रार्थ सांगणें, इत्यादि धर्मसंबंधी व न्यायाचीं वगैरे कामें करावयाचीं; अशा ह्या नेमणुकी असतात. हिंदुलोकांत पूर्वी बकरीं वगैरे मारावयाचीं तीं झटक्यानें किंवा बुक्यांनीं कुंबलून मारीत. परंतु तसें करणें गैर असें मुसलमानांनीं ठरविलें; आणि त्यासाठीं, शास्त्रविधीनें व देवाचें नांव घेऊन, जनावरांचा जीव घेणारा असा एक मुल्ला हा स्वतंत्र अधिकारीच त्यांनीं नेमण्याची वहिवाट ठेविली. मुल्लाच्या हातानें न मारलेलें जनावर खाण्याच्या योग्य नसून, तें अपवित्र ह्मणजे हराम व नापाक असें समजलें जातें.

याविषयींचा विचार सुरू झाला. नामधारी बादशाहाचे मुख्य मंत्री व चालक असे जे वैर सांगितलेले दोघे सय्यद बांधव त्यांनीं, कांहीं तरी मसलत करून रजपुतांना हरकत करण्याचा विचार चालविला. व त्यांच्या मसलतींतील एक अमीर-उल्-उमराव नांवाचा मंत्री होता तो आपलें सैन्य घेऊन राजा अजितसिंग राठोड ह्याचेवर चालून जाण्यास सिद्ध झाला. परंतु त्या नामधारी बादशाहानें त्या मंत्री सरदारास सय्यदांचे विरुद्ध कांहीं गोष्टी सांगून त्याचें मन संशयित केलें; तेव्हां अर्थात् अमीर-उल्-उमराव हा सय्यदांचें कांहींएक न ऐकतां दिल्ली येथें तसाच स्वस्थ राहिला. अशी दिल्लीच्या दरबारांत दुही माजलेली बघून अजितसिंगानें सय्यदांशीं मसलत केली, व त्यांस आपले पक्षाकडे वळवून घेतलें. अजितसिंगानें सय्यदांशीं मसलत करून असें ठरविलें कीं, आपल्याला दिल्लीदरबारांत प्रविष्ट करावें; त्याबद्दल फिरोखशीर बादशाहाला मी खंडणी देईन व त्याला आपली एक मुलगी देईन. सय्यदांनीं ह्याप्रमाणें आपल्याला एक रजपूत राजा येऊन मिळतो आहे हा एक फायदाच समजून, त्याप्रमाणें, अजितसिंगानें ह्मटलेल्या गोष्टी कबूल केल्या. येणेंप्रमाणें अजितसिंग हा पूर्वी लिहिलेल्या राजत्रयात्मक एकरूपांतून पृथक् झाला. व हा त्यानें आपल्या मित्र राजांशीं विश्वासघात केला यांत संशय नाहीं. परंतु असें करण्यांत त्याचा कांहीं वेगळा हेतु असावा असें दिसतें.

अजितसिंगाची मुलगी फिरोखशीर बादशाहास करण्याचें ठरलें. मध्यंतरीं, रजपुतांच्या आणाभाका होऊन व मोंगलांचा व रजपुतांचा इत:पर बेटीव्यवहार न होण्याचा निश्चय झाला असून, अजितसिंगानें तो निश्चय मोडला; व पुनः मोंगल व रजपूत हे परस्पर संबंधी होण्याचा योग आला. परंतु हा योग शेवटीं रजपुतांना किंवा मोंगलांना दोघांनाही हितकर न होतां, त्यामध्यें तिसरेच व अगदीं परकीय असे इंग्रज लोक शिरून, तो योग त्यांचे ऊर्जितावस्थेस मात्र कारण झाला. ती हकीकत हळू हळू यापुढें कळेलच. वर लिहिल्याप्रमाणें, अजितसिंग राठोड याच्या मुलीचें फिरोखशीर बादशाहाबरोबर लग्न होण्याचें ठरलें व तें लागलेंच अमलांतही यावयाचें; परंतु इतक्यांत बादशाहाला काळपुळी होऊन तो अत्यवस्थ झाला. तेव्हां अर्थात् हें लग्न घडून येण्याचें तहकूब झालें. बादशाहाचे या जीवावरच्या दुखण्याला उपाय करण्यास दरबारचे हकीम किंवा इतर वैद्य असमर्थ झाले. परंतु सुदैवानें, त्याच वेळीं, दिल्लीदरबारांत सुरतच्या युरोपियन व्यापारी मंडळीकडून एक इंग्रज वकील बादशाहाशीं कांहीं बोलणें करण्याकरितां गेला होता. त्याचे बरोबर त्याचा एक डाक्तर होता. सर्व हकीम व वैद्य यांचे उपाय हरल्यावर त्या डाक्तरानें आपला शेवटचा उपाय ह्मणून, दरबारच्या परवानगीनें बादशाहाचे त्या असाध्य रोगावर शस्त्रप्रयोग

करून, इंग्रजी रीतीची कांहीं औषधयोजना केली. तों कर्मधर्मसंयोग असा घडून आला कीं, त्या इंग्रजी डाक्तराचे उपायांस यश आलें; व बादशाह त्या दुखण्यांतून अगदीं बरा झाला. नंतर मग त्याचें अजितसिंगाच्या मुलीबरोबर ठरल्याप्रमाणें मोठ्या थाटानें लग्न झालें. असा थाट पूर्वी कधीं झालेला लोकांस आठवत नव्हता. पूर्वदेशीय संपत्तिमान् लोकांकडून अशा प्रसंगीं जो कांहीं महोत्सव आणि भपका दिसावयाचा तो ह्या लग्नसमारभांत दिसला. त्याबद्दलचें नामी वर्णन त्या वेळच्या दप्तरांतून असलेलें आढळतें:—"बादशाहाचा सेनापति अमीर-उल्-उमराव याचे घरीं वधूचा जानोसा असून, वधूपक्षानें सर्व खटपट अमीरानेंच केली. बादशाह (नवरदेव) सर्व राजचिन्हांनीं विभूषित होऊन त्या मंगलकार्याला अनुसरलेला पाहून, सर्व प्रजाजनांचीं मनें प्रफुल्लित झालीं. ह्या विवाहमंगलकार्याचे संबंधानें मोठमोठ्या मेजवान्या व खाने होऊन, दिल्लीस जो दीपोत्सव झाला तो तर काय अगदीं अवर्णनीयच ! त्या दीपोत्सवाचा आकाशांतील अत्युज्ज्वल आणि देदीप्यमान ग्रहमालेनें तर मत्सरच केला असेल आणि त्या दीपोत्सवापुढें आकाशातील तारामंडळ केवळ निस्तेज व फिकट दिसत होतें ! अमीर-उल्-उमराव याचे घरीं विवाहकार्य आटोपून जेव्हां त्या नवविवाहित दंपत्याची वरात निघाली, तेव्हांचा थाट काय वर्णन करावयाचा आहे ? बादशाहाचे लग्नाचीच ती वरात ! त्या वेळीं वाजणाऱ्या मगलवाद्यांच्या आवाजानें आणि लोकांकडून होणाऱ्या आनंदाच्या गजरानें सर्व दिल्लीशहराची पोकळी अगदीं नादावून गेली होती !"

असो. हा सर्व आनंदाचा दिवस ज्या इंग्रजी डाक्तराचे उपायानें व मेहनतीनें दिसला, त्या डाक्तरानें बादशाहाची मर्जी खुष करून घेऊन, आपल्या व्यापारी मंडळीचें कल्याण करून घेतलें. असें कल्याण आजपर्यंत कधींच कोणीं करून घेतलें नव्हतें; व त्याकरितांच इंग्रजी व्यापारी मंडळी (कंपनी) दिल्लीदरबारांत अर्जावर अर्ज देऊन खेपा घालीत होती. परंतु, चमत्काराची गोष्ट ही आहे कीं, जगामध्यें आपल्या उपकारकर्त्याविषयीं कृतज्ञता बाळगण्यास एखादे वेळीं लोक कसे

१. ह्या इंग्रजी डाक्तराचे नांव मि० ह्यामिल्टन् असें होते. डाक्तराचे उपायानें यश आल्यावर बादशाहानें त्याला विचारले कीं, 'तुमच्या ह्या कामगिरीबद्दल तुह्मांला काय बक्षीस द्यावें ?' हा डाक्तर ह्यामिल्टन् मोठा स्वदेशाभिमानी असल्यामुळें त्यानें आत्महितापेक्षां स्वदेशहिताकडे विशेष लक्ष्य देऊन सांगितलें कीं, 'मला स्वतःला ह्मणून कांहीं नको आहे; परंतु आमच्या व्यापारी मंडळीला राहण्यास कायमची अशी कांहीं जागा आणि आमचा व्यापार आपल्या सर्व मुलखांत अप्रतिबद्ध व कर दस्तुरी वगैरे न घेतां चालण्याचा परवाना येवढे द्या ह्मणजे झालें.' याप्रमाणें बादशाहानें डाक्तराचें मागणें कबूल करून त्याचे व्यापारी मंडळीस राहण्याला जागा आणि त्यांचे व्यापाराचे स्वातंत्र्याचा व कराचे माफीचा परवाना अशीं त्यास दिलीं; व शिवाय त्याचा बहुत सन्मान केला.

अगदीं विसरून जातात, याचें उदाहरण पहावयाचें असल्यास वरील डाक्तराचे संबंधाचेंच दिसेल. ह्या डाक्तरानें, पूर्व पृष्ठाचे खालीं टिपेंत लिहिल्याप्रमाणें, आत्महित एकीकडे ठेवून, आपल्या देशाचें हित करण्याकरितां, जें निरंतरचें व शाश्वत असें बक्षीस बादशाहापासून मिळविलें, व ज्या बक्षिसानेंच पुढें इंग्रज लोकांचा ह्या देशांत उदयकाळ झाला, त्या बक्षीस मिळविणाऱ्या आणि उपकारकर्त्या डाक्तर ह्यामिल्टन् साहेबाला सर्व इंग्रज लोक अगदींच विसरले! एका इतिहासकारानें असें ह्मटलें आहे कीं, "ज्या उपकारांची फेड द्रव्यादिकेंकरून कधींही होत नाहीं, ते उपकार कृतघ्नतेच्या नाण्यानें चांगले फेडले जातात!" आणि, ह्याप्रमाणेंच, इंग्रज लोकांनीं डाक्तर ह्यामिल्टन् साहेबाचे उपकार कृतघ्नतारूप द्रव्येंकरून फेडले, असें ह्मणण्यास चिंता नाहीं! ह्मणजे, डाक्तर ह्यामिल्टन् साहेब हा पुढें, कलकत्त्यास वारला व तेथील एका प्रार्थनालयाचे आवारांत त्याचा प्रेतविधि झाला. परंतु वर लिहिल्याप्रमाणें चमत्काराची गोष्ट ही आहे कीं, त्याच्या त्या प्रेतविधीच्या जाग्यावर त्याचे स्मरणार्थ त्याचे नांवाचा एक दगड देखील कोणीं ठेवला नाहीं! इंग्रजांच्या कृतज्ञबुद्धीचा हा एक अपूर्व मासलाच समजला पाहिजे!

हा जो रजपुतांचा आणि मोंगलांचा पुनः संबंध घडून आला, तेणेंकरून कोणत्याही प्रकारें रजपुतांचा फायदा झाल्याचें तर बिलकुल दिसत नाहीं; परंतु उलट, रजपुतांना छळण्यास आणि त्यांचा संताप करण्यास हा संबंध कारण झाला, असें ह्मटलें तरी चालेल. बादशाहानें अजितसिंग राठोडाशीं संबंध होऊन त्याचें आपल्यास पूर्ण साह्य आहे असें पाहून, त्याचे मुख्य व शक्तिमान् कारभारी जे सय्यदबांधव त्यांस युक्तीनें काढून दिलें; व त्यांचे जागीं, औरंगजेबाचे वेळीं त्याच्या मंत्रीमंडळांत असलेला व कांहीं दिवस औरंगजेबाची वजीरात भोगलेला जो इनायत-उल्ला-खान ह्मणून होता त्यास, आपला मुख्य प्रधान नेमिलें. परंतु ह्या नेमणुकींत फिरोखशीर बादशाहानें सारासार विचार बिलकुल केला नाहीं, असें ह्मणावें लागतें. कारण, ज्याणें औरंगजेबासारख्या जुलमी व मनस्वी बादशाहाचें मंत्रीत्व स्वीकारून, जो त्याचे कारकीर्दींत त्याचा वजीर होता, तो मनुष्य, ह्या वेळीं दिल्लीच्या बादशाहीचा पुनः मुख्य प्रधान व्हावा, ह्मणजे औरंगजेबाच्या वेळच्या जुलमी कारकीर्दीचें मुद्दाम परावर्त्तन करण्यासारखेंच होतें. पुढें, त्या प्रधानाच्या दुष्टपणाचा व जुलमाचा अनुभव लौकरच आला. तो अधिकारावर आला कीं त्याणें, हिंदुलोकांना अत्यंत जुलमाचा व अतिशय अप्रिय जो जेजिया ह्मणजे डोईपट्टीचा कर तो बसविला. आणि, त्यांत विशेष पक्षपात हा कीं, तो कर, औरंगजेबानें बसविल्याप्रमाणेंच, फक्त हिंदुलोकांवरच बसविला. या डोईपट्टीचा कहर व जुलूम मागें वर्णिला आहेच. तेव्हां येथें पुनः

त्याचें वर्णन देण्याचें प्रयोजन नाहीं. या करानें बादशाहाचे खजिन्यांत जी पैशाची तूट आली होती ती भरून आली, हा फायदा झाला; परंतु, त्या करानें लोकांमध्यें अत्यंत असंतोष प्रसृत झाला. नुक्ताच जो बादशाहाचा अजितसिंग राठोड याचे मुलीशीं मोठ्या समारंभानें व थाटानें विवाह होऊन, सर्व लोक त्याविषयीं आनंद मानीत होते, व कित्येक रजपुतांस, आपला बादशाहाशीं निकट भाव झाला ह्मणून त्याबद्दल अभिमान आणि ममत्व उत्पन्न झालें होतें, तें सर्व लयास जाऊन, सर्व हिंदूलोक पुन: बादशाहाचा द्वेष व तिरस्कार करूं लागले ! हा कर अंधळे, पांगळे व गरीब लोक यांस माफ होता; तरी, तो फक्त हिंदूंवरच असल्यामुळें, आणि मुसलमान ह्मणत कीं, 'काफर लोकांवर हा कर असलाच पाहिजे,' यामुळें, हिंदूरयतेस बादशाहाच्या कारकीर्दीची अतिशय चीड येऊन, ती अगदीं संतापून गेली. पूर्वी, बाबर याणे 'तेमघा' अथवा छापाचा कर, ह्मणजे स्त्यांपाची बाब, रयतेवर बसविली होती; व ती बाब मोडून ही डोईपट्टी हिंदूलोकांवर लादण्यांत आली, असें ह्मणतात. ही पट्टी पक्षपातावांचून एकंदर रयतेवर बसविली असती, तर हिंदूलोकांस इतका अपमान आणि संकट वाटलें नसतें. पूर्वी बाबरच्या वेळची स्त्यांपाची बाबही अशीच लोकांना अप्रिय झाली होती; व तीही केवळ, विधर्मी किंवा काफर ह्मणून ह्मटले जाऊन, हिंदूलोकांवरच बसली होती; त्यामुळें, ती देखील हिंदूंच्या अत्यंत असंतोषास कारण झाली होती. वरील डोईपट्टीचा आकार कांहीं फारसा रयतेस जाचण्यासारखा नव्हता. इतकेंच नव्हे; तर त्याला डोईपट्टीचा कर ह्मणण्यापेक्षां प्राप्तीवरील कर जरी ह्मटला असता तरी चालण्यासारखें होतें. कारण, तो कर वार्षिक प्राप्तीवर शेंकडा बारा आणेप्रमाणें होता; परंतु तो हिंदूंवरच बसविला असून, त्याबद्दल हिंदूलोकांना चीड व संताप येण्यासारखें मुसलमान लोक बोलत, यामुळें, तो पक्षपाताचा कर हिंदूलोकांस अगदींच असह्य झाला होता; व त्यामुळें बादशाहाविषयीं लोकांमध्यें अत्यंत अप्रीति उत्पन्न झाली होती ! वस्तुत: ह्मटलें असतां, राज्याधिकारी पुरुषाविषयीं हिंदूलोकांमध्यें स्वाभाविकच फार पूज्य बुद्धि असून, ती त्याप्रमाणेंच ठेवण्याविषयीं त्यांच्या धर्मशास्त्राची आज्ञा असतां, जेव्हां त्यांस त्या राजपुरुषाकडून पक्षपात होत असलेला दिसला, तेव्हां त्यांनीं ती धर्मशास्त्राची आज्ञा आणि आपली नैसर्गिक पूज्यबुद्धि हीं एकीकडे झुगारून देऊन, ते, बादशाहाच्या या पक्षपाती जुलमाबद्दल त्याचे विरुद्ध मसलती करूं लागले. लोकमताविरुद्ध राजानें कांहीं कृत्य केलें असतां तें लोकांना असह्य होऊन, त्याबद्दल लोकांनीं राजाचा तिरस्कार करणें हें, मानवी प्राण्यास जी स्वातंत्र्येच्छा असते तिला अनुसरूनच आहे. त्या स्वातंत्र्येच्छेपुढें धर्मशास्त्राज्ञा आणि पूज्यभाव हीं टिकाव धरून राहत नाहींत, असें आजपर्यंत आपल्याला अनेक अनुभवांवरून कळून आलें आहे !

हा सर्व प्रकार उदेपुरास राणा उमरावसिंग याला कळला; परंतु, पूर्वी जी राजत्रयाची एकवाक्यता झाली होती ती, अजितसिंगानें आपली मुलगी मोंगलांच्या घराण्यांत दिल्यामुळें, मोडल्यासारखी झाली. तरी राणा आपलें स्वातंत्र्य आणि त्याबरोबरच आपल्या लोकांचें राष्ट्र हीं अधिक दृढ करण्याचे विशेष प्रयत्नांस लागला होता. अजितसिंगानें बादशाहाला मुलगी दिल्यानंतर,¹ राण्यानें बादशाहाशीं वेगळा तहनामा

---

१. हा तहनामा पुढें लिहिल्याप्रमाणें होता:—

विनंत्यांची यादी—

"१.—सातहजार स्वारांची मनसब (सैनापत्य) आमचेकडे द्यावी.

"२.—हिंदुलोकांवर झेईपट्टीचा कर कोणत्याही रूपानें बसवूं नये. व ह्याबद्दल खुद्द बादशाहाचे "हातची पंजाची मुद्रा करून दाखला मिळाला पाहिजे.

"३.—दक्षिणेमध्यें एकहजार राठोड स्वार चाकरीस आहेत त्यांजवरील सरकारदेणें "माफ असावें.

"४.—हिंदूलोकांचीं देवस्थानें मुसलमानांनीं जीं मोडलीं आहेत तीं फिरून बांधून देऊन, "तेथील पूजा अर्चा पूर्ववत् चालू ठेवण्यास हिंदूंना हरकत होऊं नये.

"५.—माझे चुलते, मामे, भाईबंद किंवा सरदार जे कोणी दरबारांत येतील त्यांचा माझेप्रमा-"णेंच मान रहावा.

"६.—देवळा, बांसवाडा, डोंगरपूर आणि सिरोही येथील माझे मांडलिक ठाकूर व माझे "ताब्यांतील इतर जमीदार, यांची व बादशाहांची परस्परें भेट होऊं नये; त्यांच्या भेटी माझे "मार्फत झाल्या पाहिजेत.

"७.—माझेजवळ जी फौज आहे ती माझे सरदारांची आहे; ती बादशाहांला वाटेल तेव्हां "त्यांनीं नियमित काळपर्यंत आपल्या मदतीला मागून घ्यावी. फौज मदतीला असेपर्यंत तिच्या "शिध्यासामग्रीची व्यवस्था बादशाहांचे दरबारांतून राहावी; तिच्या मुशाहिऱ्याचा हिशेब मात्र "मागाहून होत जाईल.

"८.—बादशाहांची नौकरी जे हक्कदार, जमीनदार व मनसबदार वगैरे सरदार अंतःकरण-"पूर्वक उत्साहानें करतील, त्यांची यादी मजकडे पाठवावी. आणि जे बादशाहांची आज्ञा अमान्य "करतील त्यांस मी शिक्षा करीन. परंतु, माझे सरदार बादशाहांचे कामगिरीसाठीं फिरत असतां "त्यांच्या फौजेकडून कोणाच्या शेतांभातांची नुकसानी झाली, तर त्याबद्दलची जबाबदारी मजवर "नसली पाहिजे.

"९.—फूलिया, मांडेलगड, बेदनूर, पूर, बसार, ग्यासपुरपरधर, बांसवाडा आणि डोंगरपूर हे "महाल व तेथील पांचहजार स्वारांची मन्सब मला द्यावी. ह्या जुन्या ५००० स्वारांशिवाय, गादीवर "बसावयाच्या वेळेस कबूल केलेले १००० व सिन्सिनी येथें जय मिळाला त्या वेळीं बोलल्याप्रमाणें "१००० स्वार आणखी, अशी ७००० स्वारांची मनसब पहिल्या कलमांत म्हटल्याप्रमाणें द्यावयाची.